# छत्रपती शिवाजी महाराज
# जीवन-रहस्य



नरहर कुरुंदकर

अनुक्रम

# १. इतिहासातील नवखी घटना

छत्रपती शिवाजी महाराजांबाबत इतर सर्व महापुरुषांपेक्षा एक निराळी बाब घडली आहे. भारतात राजे थोडे झाले नाहीत. जे परंपरेने चालत आलेल्या वाडवडिलांच्या गादीवर बसले त्यांची संख्या तर फार मोठी आहे, पण जे राज्यनिर्माते होते त्यांचीही संख्या थोडी नाही. नवे राज्य निर्माण करणारे चांगले राजे भारताच्याही इतिहासात अधूनमधून होऊन गेले. समकालीन आणि उत्तरकालीन पुरुषांनी त्यांची पुण्यवानांमध्ये गणना केली. नल-युधिष्ठिरापासून भोज-विक्रमादित्यापर्यंत अनेक राजे पुण्यश्लोक म्हणून गणले गेले. पण समकालीनांनी आणि उत्तरकालीनांनी मोठ्या श्रद्धेने जो राजा ईश्वरी अवतार मानला, असा एकटा शिवाजीच आहे! समकालीन महाराष्ट्रीयांपासून उत्तरकालीनांपर्यंत जवळजवळ तीनशे वर्षे हा कर्ता राजा ईश्वरी अवतार होता, अशी श्रद्धा चालत आली आहे. छत्रपतींना साधारणपणे भगवान शंकराचा अवतार मानण्यात येते. पण एखादा परमानंदांसारखा चरित्रकार त्यांना भगवान विष्णूचा अवतारही मानतो. खरोखरच शिवाजी महाराज ईश्वरी अवतार होते काय, या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर देता येणे कठीण आहे. ज्या मंडळींचा ईश्वरी अवतारावर विश्वास आहे आणि परमेश्वर पुन्हा पुन्हा जगाच्या कल्याणासाठी अवतार घेत असतो यावर विश्वास आहे, त्यांच्यासाठी शिवाजीचे परमेश्वरी अवतार असणे ही वादातीत गोष्ट आहे. ज्यांचा असा ईश्वराच्या अस्तित्वावर विश्वास नाही, त्यांना या श्रद्धेशी सहमत होता येणे अशक्यच आहे. समाजात एखाद्या माणसाविषयी त्याला ईश्वरी अवतार समजण्याइतकी पूज्यता का निर्माण व्हावी, हा मात्र विचार करण्याजोगा प्रश्न आहे. त्याचे उत्तर ईश्वरावर श्रद्धा असणाऱ्या आणि नसणाऱ्या सर्वच अभ्यासकांना द्यावे लागणार आहे.

### श्रद्धेने निर्माण होणारा पायगुंता

शिवाजी महाराजांच्याविषयी विचार करताना जो पहिला प्रश्न विचारायचा तो हाच की, समाजात अशी श्रद्धा निर्माण का होते? या प्रश्नाचे सर्वात सोपे उत्तर असे आहे की, समाज अंधश्रद्ध असतो म्हणून असे घडते! हे उत्तर सोपे

असले तरी खरे नव्हे. शतकानुशतके समाज धर्मश्रद्ध राहातच आला आहे. स्वतःच्या धर्माचा राजा आपल्यावर राज्य करतो आहे, हे पाहण्याची वेळ अनेकदा येते. विजयनगरच्या सर्व राजांना हा योग आलेला होता. पण धर्मश्रद्ध जनतासुद्धा सर्वच राजांना ईश्वरी अवतार मानीत नाही. परंतु ती या महापुरुषाला ईश्वरी अवतार मानते; आणि धर्मश्रद्ध नसणाऱ्या चिकित्सकांना धार्मिक शब्दरचना जरी पटली नाही; तरी जनतेचा कौल अत्यंत योग्य आहे, असा निर्णय द्यावा लागतो. हे का घडते? म्हणूनच या प्रश्नाच्या उत्तरासाठी शिवाजीच्या सर्व कर्तृत्वाचा एखाद्या नव्या संदर्भात विचार करावा लागतो. व्यक्तिशः मी फारशी धर्मश्रद्धा नसणारा आणि कर्तृत्वाला प्राधान्य देणारा असल्यामुळे माझी पाहण्याची पद्धत ही धर्मश्रद्ध मंडळींपेक्षा निराळी असणार हे उघड आहे. एका व्यक्तित्त्वाच्या कर्तृत्वाचा आलेख समजून घेणे ही गोष्ट व्यक्तीला ईश्वरी अवतार मानण्यापेक्षा महत्त्वाची असते. माणसाचा देव ज्या वेळेला केला जातो त्या वेळेला त्याच्या अभ्यासाचीही गरज संपते, अनुकरणाचीही गरज संपते. हा श्रद्धेने निर्माण होणारा फार मोठा पायगुंता आहे. तो टाळण्याचा आपण यथाशक्ती प्रयत्न केला पाहिजे.

### मनोरचनेचे काही अडथळे

छत्रपतींच्या अभ्यासाला त्यांना ईश्वरी अवतार मानणे एवढा एकच अडथळा नाही, अजूनही पुष्कळ अडथळे आपल्या मनोरचनेमुळे निर्माण झालेले आहेत. विशेषतः समाजाला नाट्यमय आणि रोमांचकारी घटनांची जास्त आवड असते. अशा नाट्यमय घटनांवर लक्ष खिळून राहिले म्हणजे मग खरे कर्तृत्व दृष्टीआड होण्याचा धोका असतो. सर्वसामान्य माणसांनी स्वतःच्या कल्पनेतून आणि स्वप्नरंजनातून जसे नेहमीचे चित्र उभे केलेले असते, त्याच्याशी मिळतेजुळते असे वास्तवातील खरे चित्र नसते. महाराजांच्या जीवनात रोमांचकारी घटना म्हणून ज्यांचा उल्लेख करता येईल, अशा घटनांची संख्या तर पाच-सहापेक्षा जास्त नाही. या रोमांचकारी घटनांमधील पहिली अद्‌भुत घटना अफझलखानवध ही आहे. त्यानंतरची म्हटल्यास, पन्हाळगडावरून पलायनही अद्‌भुत आहे. म्हटल्यास तिचा संबंध शिवाजी महाराजांपेक्षा बाजी प्रभू देशपांडे यांच्या बलिदानाशी आहे. यानंतर शाहिस्तेखानाची नाट्यमय घटना आहे. सुरतेची लूट ही काही नाट्यमय घटना म्हणता येणार नाही. मुरारबाजीचे बलिदान, तानाजी मालुसरेचे बलिदान या घटना नाट्यमय असल्या, तरी प्रत्यक्ष शिवाजीच्या जीवनातील नाहीत. आग्र्याहून सुटका ही या चरित्रातील शेवटची

नाट्यमय घटना आहे. पहिल्या नाट्यमय घटनेपूर्वी २९ वर्षांचा दीर्घ, नाट्यशून्य काळ आहे. शेवटच्या नाट्यमय घटनेनंतर पुन्हा नाट्यशून्य अशी १४ वर्षे आहेत. सगळ्या नाट्यमय घटनांचा कालखंड हा उणापुरा सात वर्षांचा आहे. पन्नासपैकी सात वर्षांत ज्या पाच-सहा नाट्यमय घटना घडतात, त्यांच्या आधारे आपल्या आवडत्या नायकाची वाङ्मयीन पूजा बांधता येते. पण अशा नाट्यमय घटना कर्त्या पुरुषाचे कर्तृत्व सांगण्यास फारशा उपयोगी पडत नाहीत. राष्ट्राची उभारणी चिवटपणे, सातत्याने, दीर्घकाळ, सामान्य घटनांच्यामधून होत असते. राष्ट्रांच्या काय की, व्यक्तींच्या काय, जीवनात नाट्यमय घटना फार थोड्या असतात; आणि सत्य समजून घ्यायचे तर या नाट्यमय घटनांमागे असणारी गुंतागुंतीची रुक्ष, गद्यमय कहाणी जास्त महत्त्वाची असते. छत्रपतींचे कर्तृत्व समजून घेताना या रोमांचकारी घटनांचा मोह आपण टाळला पाहिजे.

### प्रश्न दोन : उत्तर एक

अनेकांच्या मनात वर्तमानकाळातील हिंदूविरोधी मुसलमान अशा प्रकारचा झगडा असतो. स्वत:च्या मनातील हा असत्य आणि अनुचित संघर्ष मागच्या इतिहासामध्ये पाहण्याची काही जणांची धडपड असते. या दृष्टीने शिवाजी महाराजांकडे हिंदूंचा राजा म्हणून आणि त्यांच्या कार्याकडे मुसलमानांच्या विरुद्ध हिंदूंचा उठाव म्हणून पाहणे काही जणांना आवडते. प्रत्यक्ष शिवाजीमहाराजांच्या चरित्रात अशा धार्मिक संघर्षाला फारसा वाव नाही. ते स्वत: हिंदूधर्मीयांच्या धार्मिक राजवटीच्या निर्मितीसाठी झगडत नव्हते. आपल्या राज्यात हिंदूंच्या धार्मिक आदेशांनुसार श्रुति-स्मृति-पुराणांना अनुसरून एक राज्य निर्माण करण्याची त्यांची इच्छाही नव्हती; तसा त्यांचा प्रयत्नही नव्हता. प्रत्यक्ष त्यांच्या स्वत:च्या आरमारात दर्यासारंग दौलतखान, इब्राहीमखान असे अनेक मुस्लिम अधिकारी होते. त्यांच्या फौजेत विजापूरहून आलेले सातशे पठाणही होते. त्यांनी स्वत: सर्व मुस्लिम धर्मस्थानांना संरक्षण देण्याचा कसोशीने प्रयत्न केला. राजकारणाच्या पटावर औरंगजेबाविरुद्ध ते उभे होते, तरी त्यांनी औरंगजेबाला त्याचे पणजे अकबर बादशहा यांच्या थोरवीची आठवण करून दिली आहे. कुतुबशाहीशी त्यांचे संबंध प्राय: प्रेमाचे आणि मित्रत्वाचे राहिले. या संघर्षाकडे आपण दुसऱ्या बाजूकडूनही पाहू शकतो. त्यांना आयुष्यभर ज्या वतनदारांविरुद्ध लढावे लागले ती नुसती त्यांच्या धर्माची माणसे नव्हती, तर त्यांच्या सोयरसंबंधातील माणसे होती. घोरपडे, निंबाळकर, जाधव, सावंत, सुर्वे असे अनेक वतनदार नेहमीच त्यांच्याविरुद्ध राहिले.

शिवाजी महाराजांच्याविरुद्ध त्यांच्याच धर्मातील वतनदार का उभे राहिले, हा पहिला प्रश्न आणि दुसरा, लक्षावधी जनतेने त्यांना ईश्वरी अवतार म्हणून का पाहिले? या दोन्ही प्रश्नांचे उत्तर एकच आहे.

### एतद्देशीयांचे राज्य हा उद्देश

शिवाजीराजे जसे हिंदू धर्माचे धार्मिक नेते नव्हते, तसे ते महाराष्ट्राचे अगर मराठ्यांचेही नेते नव्हते. शिवाजी राजांच्या मोठेपणाला महाराष्ट्राच्या चौकटी घालून आपण त्यांच्यावर फार मोठा अन्याय करीत आहोत, हे सहजासहजी लक्षात येत नाही. छत्रपतींचे राज्य महाराष्ट्राच्या बाहेर त्या वेळच्या कर्नाटकात म्हणजे आजच्या तामिळ प्रदेशातही काही प्रमाणात पसरलेले होते. जिंजी आणि तंजावर प्रांती असणारे आपले राज्य शिवाजी महाराज वसाहत मानत होते काय? या प्रदेशाला ते आपला जित प्रदेश समजत होते काय? या प्रश्नाचे उत्तर आपण एकदा स्पष्टपणे दिले पाहिजे. शिवाजी महाराजांच्या मनात आपले राज्य काशीपर्यंत वाढवावे अशी इच्छा असणे स्वाभाविक आहे. समजा, महाराजांनी काशी जिंकली असती, तर त्यांनी तो भाग आपला जित प्रदेश मानला असता काय?

पुरावा असे सांगतो की, शिवाजी राजांची भूमिका महाराष्ट्राच्या चौकटीत मावणारी नव्हती. ती भूमिका हिंदवी स्वराज्याची म्हणजे एतद्देशीयांच्या राज्याची होती. सर्व भारतभर कुठेही राज्य निर्माण करता येणे त्यांना जमले असते, तर त्यांनी त्या प्रदेशातील जनतेचे नेते म्हणूनच राज्य केले असते. भारतातील कोणत्याही एका प्रदेशाचे ते स्वत:ला नेते समजले नसते. त्यांनी स्वत:ला जनतेचे प्रतिनिधी आणि तिचे मुक्तिदाते मानले असते. आपण एतद्देशीयांचे राज्य या देशावर व्हावे या भूमिकेचे समर्थक आहोत, असे छत्रपतींनी मानले आहे आणि हे राज्यसुद्धा त्यांनी स्वत:चे न मानता परमेश्वराचे मानले आहे. एतद्देशीयांचे राज्य येथे स्थापन व्हावे ही 'श्रीं'ची इच्छा आहे, या भूमिकेला अनुसरून त्यांची वर्तणूक चाललेली दिसते.

### एक मूलभूत चूक

मध्ययुगातील सारे समाजजीवन धर्मप्रधान आहे. आजच्या विसाव्या शतकातसुद्धा राजकारणाला धर्माचा रंग देणे कठीण जात नाही. सतराव्या शतकात तर कोणत्याही घटनेला धर्माचा रंग चढत असे. त्यामुळे ज्या घटना खरे म्हणजे आशय दृष्टीने धर्माच्या बाहेरच्या आहेत, त्या घटनांचे वर्णन करताना

जणू त्या घटना धार्मिक आहेत, असे गृहीत धरूनच वर्णन केले जाते. युरोपातसुद्धा मध्ययुगात वेळोवेळी असे घडलेले आहे. सोळावे शतक स्पेनच्या वर्चस्वाचे शतक होते. हे स्पेनचे वर्चस्व संपल्याशिवाय इंग्लंडला आपल्या महत्त्वाकांक्षेसाठी वाटच मोकळी होणार नव्हती. शेवटी सोळाव्या शतकाच्या अखेरीस इंग्लंडने स्पेनच्या आरमाराचा पराभव केला. खरे म्हणजे ही दोन विजिगिषू राष्ट्रांच्या राज्यस्पर्धेमधील एक शुद्ध इहलौकिक घटना होती, पण समकालीनांच्यापैकी अनेकांना हा अँग्लिकन चर्चने रोमन कॅथॉलिक चर्चचा केलेला पराभव वाटला! परस्परांच्या विरोधी उभी राहणारी माणसे कोणत्या ना कोणत्या धर्माची असतच, त्यांच्यामधील राजकीय ध्येयवादाच्या संघर्षाला दोन धर्मांच्यामधील परस्परविरोधी संघर्ष समजणे हीच एक मूलभूत चूक आहे. मध्ययुगातील अनेक संघर्षांचा अर्थ यामुळे कळू शकत नाही.

### एक अपसमज

ज्या वेळी मी छत्रपतींच्या नेतृत्वाचा विचार करतो, त्या वेळी मला स्वत:ला दोन प्रश्न मी नेहमी विचारतो. यातील पहिला प्रश्न, लोक या माणसाला ईश्वरी विभूती का मानतात, असा आहे. दुसरा प्रश्न–औरंगजेब आपली राजधानी सोडून दक्षिणेत उतरला आणि त्याच्यासारख्या कसलेल्या सेनानीला मराठ्यांचे राज्य नष्ट करण्यात यश का आले नाही, हा आहे. आलमगीर औरंगजेब हा आपल्या काळातला कुशल सेनापती, युद्धनीतितज्ज्ञ आणि मुत्सद्दी असा राजा होता. इ.स. १६८१ साली आपल्या लक्षावधींच्या फौजा घेऊन औरंगजेब जेव्हा दक्षिणेत उतरला त्या वेळी त्या संघर्षाचे स्वरूप आशयाच्या दृष्टीने धार्मिक नव्हते. एक तर औरंगजेबाच्या फौजेत अक्षरश: लाखांनी मोजावे लागेल एवढे मोठे प्रमाण हिंदू सैनिकांचे होते. नुसते सैनिकच नव्हते, तर अनेक सरदार आणि सेनापती हेही हिंदू धर्माचे होते. औरंगजेबाच्या फौजेत असणाऱ्या हिंदूंना हा लढा दोन धर्मांच्यामधील आहे असे वाटलेले दिसत नाही. स्वत: औरंगजेबसुद्धा मराठ्यांच्या राज्याबरोबर आदिलशाही व कुतुबशाही ही दोन मुस्लिम राज्ये नष्ट करण्याचे ठरवून आलेला होता! मुसलमान आदिलशहा व कुतुबशहा आणि हिंदू संभाजी एका बाजूला आणि मुसलमान औरंगजेब, त्याचे लाखो हिंदू सैनिक व शेकडो हिंदू सरदार दुसऱ्या बाजूला – असा हा संघर्ष होता. हा दोन धर्मांच्यामधील संघर्ष नव्हता. तरीही औरंगजेब या संघर्षात यशस्वी होऊ शकला नाही.

## आलमगिराचा मोर्चा शिवाजीकडे का वळला?

खरे म्हणजे औरंगजेबाने शिवाजीकडे दुर्लक्ष करायला काय हरकत होती? जहांगीरच्या काळापासून काबूल आणि कंदाहार या प्रदेशावर ताबा मिळवण्यासाठी इराणी व मोगल यांचा झगडा चालूच होता. औरंगजेबानेही दीर्घकाळ काबूल, कंदाहार जिंकण्याचा प्रयत्न केला आणि शेवटी ते जिंकता येणे शक्य नाही म्हणून तिकडे लढण्याचा नाद सोडला. त्याने आसाममधील आहोम राजवटी जिंकण्याचाही प्रयत्न केला आणि त्या आघाडीवर फारसे यश मिळत नाही, हे पाहिल्यानंतर तिकडील चढाईही त्याने आटोपती घेतली. आनाठायी व व्यर्थ शक्तीचा अपव्यय नको, ही गोष्ट आलमगीरला भारताच्या वायव्य आणि ईशान्य सीमेवर पटली होती. याच पद्धतीने त्याने दक्षिणेचा विचार का करू नये? क्षेत्र मर्यादेच्या दृष्टीने पाहिले तर, शिवाजीचे राज्य फारसे मोठे राज्य नव्हते. दक्षिण भारताच्या पश्चिमेकडील एका कोपऱ्यात, डोंगराळ भागात वसलेले हे छोटेसे राज्य! हे बुडवण्याची जिद्द एवढ्या मोठ्या प्रमाणात आलमगिराने धरण्याचे काही कारण नव्हते, हे त्याने केलेल्या तयारीवरून आपण समजू शकतो. एका छोट्या लढाईसाठी स्वत: जातीनिशी इतक्या दूरवर येण्याचे काहीच कारण नव्हते.

## आलमगिराचा चिवटपणा

औरंगजेबाची मराठ्यांच्या राज्यावरील स्वारी १६८० पासूनच ठरू लागलेली होती. फौजांची जमवाजमव झाल्यानंतर व सरकारस्वारी ही दक्षिणेत आल्यानंतर इ.स. १६८२ ला ही स्वारी कार्यान्वित झाली. यावेळी शिवाजीचा देहान्त झाला होता. छत्रपतींचे अवघे पन्नास वर्षांचे वय लक्षात घेता त्यांचा मृत्यू अनपेक्षित होता! औरंगजेबाने शिवाजीविरुद्ध मोहीम आखलेली होती. शिवाजीच्या मृत्यूनंतरही मोहीम चालू राहिली इतकाच त्याचा अर्थ आहे. इ.स. १६९२-९३ च्या नंतर या युद्धात आपला जय होणे शक्य नाही, याची औरंगजेबालाही खात्री पटलेली होती. तरीही तो शेवटची चौदा-पंधरा वर्षे लढतच राहिला. राजधानीपासून दूर, दरसाल कोट्यावधी रुपयांचा खर्च करून, जिंकणे शक्य नसणारी लढाई आपण लढतो आहोत आणि याच्या परिणामी सर्व साम्राज्यभर अव्यवस्था निर्माण होत आहे, हे आलमगीरालाही कळत होते आणि तरीही तो शेवटपर्यंत लढत राहिला. आलमगीराच्या या चिवटपणाचा अर्थ काय?

## एक अनोखी घटना

आणि मराठेही लढतच राहिले. त्यांचे राज्य लहान होते. या राज्यातील साधनसंपत्ती अतिशय मर्यादित होती. विरुद्ध बाजूच्या फौजांच्या मानाने मराठ्यांच्या फौजांची शक्ती थोडी होती. औरंगजेब मैदानात उतरण्यापूर्वीच शिवाजीसारखा असामान्य नेता दिवंगत झालेला होता. पहिल्या काही वर्षांतच हंबीरराव मोहित्यांसारखा कुशल सेनापती व संभाजीसारखा युद्धकुशल नेता त्यांनी गमावलेला होता आणि समोरासमोरच्या युद्धात औरंगजेबाचा पराभव करता येणेही शक्य नव्हते. उलट औरंगजेब लढायांमागून लढाया जिंकतच चालला होता. मराठे विरुद्ध मोगल या लढ्यात जितक्या लढाया औरंगजेबाने जिंकल्या, त्याच्या निम्म्यानेही मराठ्यांना जिंकता आल्या नाहीत!

जदुनाथ सरकारांनी या घटनेचे मार्मिक वर्णन केले आहे. ते म्हणतात, 'लढायांमागून लढाया औरंगजेबाने जिंकल्या, पण तो युद्ध जिंकू शकत नव्हता. विजयामागून विजय त्याने संपादन केले, पण तो मराठ्यांना पराभूत करू शकला नव्हता.'

या घटनेचा थोडक्यात अर्थ असा की, आरंभी तर सोडा- शेवटच्या काळातही समोसमोरच्या लढाईत औरंगजेबाचा पराभव करणे मराठ्यांना शक्य नव्हते. साधनसामग्री नसताना, असामान्य नेता नसताना, सर्व प्रतिकूल परिस्थितीच्या विरुद्ध जनता न थकता लढत होती. एखादे राज्य टिकवण्यासाठी फारसे मोठे नेतृत्व नसणाऱ्या जनतेने इतका दीर्घकाळ लढा द्यावा ही घटनाच हिंदुस्थानाच्या इतिहासात नवखी आहे, एकाकी आहे.

## २. जनेतेचे राज्य

हिंदुस्थानाच्या इतिहासात हिंदू राजे आपापसात लढले, मुस्लिम राजे आपापसात लढले, हिंदू-मुस्लिम राजेही लढले. वेळोवेळी कुणाचे तरी जय, कुणाचे तरी पराजय होत आले. पण जय-परायजाचे निर्णय रणमैदानावर लागले. रणमैदानावर जो नेता जिंकला, त्याचे राज्य जनतेने कधी कुरकुरत तर कधी उत्साहाने मान्य केले. पण या पलीकडे जनतेने कधी राज्याचे रक्षण करण्यात भाग घेतला नाही. कारण ही राज्ये राजांची होती. ही जनतेची राज्ये नव्हती. कुणी नेता असो अगर नसो, हे माझे राज्य आहे, ते मला टिकवलेच पाहिजे, या जिद्दीने जनता मध्ययुगीन भारताच्या इतिहासात फक्त एकदाच लढली- ती या शिवाजीच्या राज्यासाठी...!

### जनतेच्या स्वातंत्र्याकांक्षेचा प्रतिनिधी शिवाजी

शिवाजीचे मोठेपण असेल तर त्याची कसोटी ही जनतेने त्याच्या मृत्यूनंतर दिलेल्या लढ्याची आहे. सतराव्या शतकातील पद्धतीनुसार शिवाजीने स्वत:ला राजा म्हणून घेतले असेल, त्या वेळच्या पद्धतीनुसार त्याने राज्याभिषेकही करवून घेतला असेल, पण ते राज्य शिवाजी या माणसाचे राज्य नव्हते. शिवाजीने राज्य त्याच्या श्रद्धेनुसार परमेश्वराचे मानले आहे; पण शिवाजीच्या प्रजेने ते राज्य आपले स्वत:चे मानले. हे माझे राज्य आहे, कुणी नेता असो अगर नसो, हे माझे राज्य मला प्राणपणाने टिकवले पाहिजे, असे त्या जनतेला वाटले, ही फार महत्त्वाची बाब आहे. मध्ययुगासारख्या कालखंडात जेव्हा जनतेला आपले वाटणारे राज्य निर्माण होते त्या वेळी या राज्याचा बाह्याकार मध्ययुगीन राजेशाहीचा राहिला, तरी त्या राज्याचे अंतरंग व वास्तवता खऱ्या लोकशाहीची होऊन जाते. भारताच्या इतिहासात अशी ज्योत जनतेच्या मनात शिवाजीने प्रथम पेटवली म्हणून शतकानुशतके लोक त्याला आपला त्राता, उद्धारकर्ता मानत आले. कोणत्याही शतकातील जनतेच्या मनात असणाऱ्या प्रबळ स्वातंत्र्याकांक्षेचा शिवाजी हा प्रतिनिधी ठरला.

### शिवाजीचे राज्य हे एक आव्हान होते

जनतेची स्वातंत्र्याकांक्षा ही नेमकी अशी गोष्ट आहे, जिच्याकडे औरंगजेब किंवा अन्य कोणताच राजा दुर्लक्ष करू शकत नव्हता. मोगल राजसत्तेची भूमिका आपण या प्रदेशाचे जेते आहोत ही होती. दीर्घकाळपर्यंत त्यांचा राज्यकारभार तुर्की भाषेतून चालला, आणि आपण या प्रदेशाचे जेते आहोत ही भूमिका चालूच राहिली. हा एकेका समजुतीचा प्रश्न आहे. आलमगीर औरंगजेब स्वत: भारतात जन्मला, त्याचे वडीलही भारतात जन्मले, पण आपण तुर्कीच्या खलिफाचे प्रतिनिधी आहोत, असे औरंगजेबाने मानले! भारत हा विजित देश आहे, अशी त्याची भूमिका होती. कोणत्याही जेत्यांना शिवाजीचे राज्य हे एक आव्हान होते. ते जेत्यांना तर आव्हान होतेच, पण त्या काळच्या सरंजामशाही वतनदारांनाही हे राज्य हे एक आव्हान होते. जनतेला आपले स्वत:चे वाटावे असे राज्य ही कुणालाच दुर्लक्षित करता येणारी गोष्ट नव्हती. औरंगजेबालाही तिकडे दुर्लक्ष करणे शक्य नव्हते. म्हणून औरंगजेब यशाची आशा नसताना सर्व शक्ती पणाला लावून लढला. कारण शिवाजीचे राज्य हे जनतेचे राज्य होते. शिवाजीच्या नेतृत्वाचा अभ्यास म्हणजे असा आत्मविश्वास जनतेत निर्माण करणाऱ्या एका चारित्र्यवान युगप्रवर्तक नेत्याचा अभ्यास असतो.

### क्रांतीच्या इतिहासाचे स्वरूप

हा शिवाजीसारखा लोकनेता सतराव्या शतकातील असल्यामुळे त्याच्या सार्वजनिक जीवनातील काही घटकांचा नव्याने विचार करायला हवा. सतराव्या शतकात सर्व जगभर कुठेही कायदेशीर लोकशाही अस्तित्वात नव्हती. लोकशाहीत व्यक्तींना विचार करण्याचे, या विचारांना अनुसरून प्रचार व संघटना करण्याचे आणि आपल्या पाठिंब्याच्या जोरावर शासन ताब्यात घेण्याचे जनतेचे हक्क मान्य असतात. हे हक्क मान्य असल्यामुळे कोणत्या विचाराला जनतेचा पाठिंबा आहे, जनतेला काय हवे आहे, हे स्थूलमानाने ओळखण्याची सोय उपलब्ध असते. पण ज्या राज्यरचनेत आणि समाजरचनेत व्यक्तींना आपले विचार व्यक्त करण्याची, संघटित होण्याची संधीच नाही, तिथे जनतेचा पाठिंबा आधी सिद्ध करावा आणि मग शासन ताब्यात घ्यावे ही क्रिया घडूच शकत नाही. शासन स्वत:च्या दंडशक्तीवर उभे असते. आपल्या विरोधी जाईल त्याचे दमन करण्याची शासनाची तयारी असते. अशा वेळी दडपल्या गेलेल्या जनतेचा आवाज सशस्त्र उठावांच्याखेरीज इतर कोणत्याही मार्गाने व्यक्त होऊ शकत नाही. या संदर्भात सर्व क्रम उलटून जातो. जगातील कोणत्याही सशस्त्र

क्रांतिकारकाला क्रांतीची प्रेरणा आपल्या स्वतःच्या अंतःकरणातून घ्यावी लागते. स्वतःच्या स्फूर्तीनुसार हा क्रांतिकारक जनतेच्या नावाने अन्यायाच्या विरोधात बंड करून उठतो आणि हे करताना सर्वस्व बलिदानाची तयारी ठेवतो. हा क्रांतिकारक जनतेने निवडलेला नसतो, लोकांनी त्याला 'क्रांती कर' म्हणून सांगितलेले नसते. आपले विचार जनतेला पटतात की नाही, याविषयी त्याने व्यापक प्रमाणावर लोकमत आजमावलेलेही नसते. सर्वांचे कल्याण कशात आहे, या प्रश्नावर अशा क्रांतिकारकांनी फक्त स्वतःच्या मनाचा कौल घेतलेला असतो. अनुयायी आणि सहकारी यांचा उदय त्यानंतर होतो. हे सहकारी उदयाला येत असतानाच समर्थक उदयाला येतात आणि जनता हा उठाव सर्वथैव रास्त मानते; क्रांतिकारकांच्या मागे श्रद्धेने उभी राहते;ही घटना सर्वांत शेवटी येते. रशियाची राज्यक्रांती असो, की चीनची, सर्व क्रांत्यांचा इतिहास एका विशिष्ट अर्थाने क्रांतिकारकांनी स्वतःच्या आत्म्यातून प्रेरणा घेण्याचा इतिहास असतो.

या ठिकाणीच एक फार महत्त्वाचा धोका दडलेला आहे. ज्याप्रमाणे शिवाजीने असलेली राजवट अयोग्य ठरवली आणि उठाव करून नवी राजसत्ता निर्माण केली, त्याप्रमाणे इतर अनेकांनीही नव्या राजवटी स्थापन केल्या आहेत. अशा उठावांतून कधी असे घडते की, जुन्या अव्यस्थित राजवटीपेक्षा नवीन व्यवस्थित राजवट येते. कधी माणसे बदलतात आणि राज्य तेच चालू असते. अशा सर्व ठिकाणी उठाव असतोच. नव्या नेत्यांनी आपले कृत्य रास्त मानलेले असतेच. नंद-राजवट उलथून पाडून आपले राज्य निर्माण करणाऱ्या चंद्रगुप्त मौर्याने काय, की स्वतंत्र राजवट निर्माण करणाऱ्या हसन गंगू बहमनीने काय, स्वतःचे कृत्य निदान स्वतःच्या मनाशी समर्थनीय मानले असेलच. सम्राट अकबराच्याविरुद्ध उठाव करणाऱ्या राजपुत्र सलीमनेही स्वतःचे बंड निदान स्वतः समर्थनीय मानलेच असेल. अशा वेळी आपली राजसत्ता निर्माण करणारे इतर पराक्रमी पुरुष आणि क्रांतिकारक यांच्यात फरक नेमका कसा करायचा? भाषा पाहिली तर ती कुठे चकवा देईल याचा नेम नसतो. कारण क्रूर हुकूमशाह्या लादणारेही भाषेच्या दृष्टीने जनतेची सेवाच आपले ध्येय असल्याचे सांगत असतात.

### लोकमत - दर्शनाची जुनी रीत

जुन्या काळातील उदाहरणे आपण सोडून देऊ आणि विसाव्या शतकातील प्रश्न विचारू. लष्करी हुकूमशाह्या अनेकदा, अनेक ठिकाणी निर्माण झाल्या

आहेत. हे लष्करी हुकूमशहा आणि इजिप्तचा लोकनेता जनरल नासेर यांच्यात नेमका फरक काय आहे? खाडिलकरांनी आपल्या एका नाटकात हा प्रश्न उपस्थित केलेला आहे. त्यांच्या 'स्वयंवर' नाटकात कृष्ण म्हणतो की, 'कंसाची राजवट जुलमी आणि अत्याचारी आहे, हे लक्षात घेऊन मी कंसाचा वध केला आणि त्याची राजवट समाप्त केली. पण हे माझे करणे योग्य होते काय? कंसाला मारण्याचा मला हक्क होता काय? कंसवधाचे कृत्य हे मंगल, पुण्यमय कृत्य आहे काय? याचा निवाडा कोण देणार?' कृष्ण म्हणतो, 'जेव्हा तलवारींनी प्रश्न सोडवले जातात तेव्हा त्या कृत्यांची पापमयता, पुण्यमयता, सौंदर्य कोणाच्या बाजूने कौल देते यावरून ठरणार आहे.' आपण रुक्मिणीच्या ठिकाणी जनतेतील सर्व सद्भावना आणि लोकभावनांचे प्रतिनिधित्व करणारे कवी असा बदल केला, तर क्रांतीची समर्थनीयता जनतेची श्रद्धा ठरवते असा त्याचा अर्थ होईल. लोक घडलेल्या कृत्याबाबत तटस्थ आहेत, उदासीन आहेत, की घडलेले कृत्य आपल्या मुक्ततेचे आहे असे समजत आहेत, यावर क्रांतीचे मांगल्य ठरत असते. आपल्या मनाचा कौल घेऊन क्रांतिकारक जनतेच्या नावे बलिदानासाठी उभा राहतो. ज्या वेळी जनता या क्रांतिकारकाला पुण्यपुरुष मानू लागते आणि त्याच्यापासून बलिदानाची प्रेरणा घेऊ लागते त्या वेळी ही क्रांती लोकमान्य होऊन जाते. ही जनतेची श्रद्धा आणि मान्यता, कवींनी दिलेले नायकत्व एखाद्या व्यक्तीला युगनेता ठरवून जाते. मध्ययुगात यापेक्षा वेगळी अशी लोकमत आजमावण्याची दुसरी यंत्रणा नव्हती.

### रूढ परिभाषा अपुरी

शिवाजीच्या संदर्भात या सर्व बाबी मुद्दाम सांगितल्या पाहिजेत. एक तर शहाजी आदिलशाहीचा सरदार होता. शिवाजी त्याचा पोट-मोकासेदार होता. म्हणजे पर्यायाने तो आदिलशाही दौलतीचा सेवक होता. पुरंदरच्या तहानंतर तो मोगल साम्राज्याचाही सेवक झालेला आहे. या दोन्ही ठिकाणी रूढ पद्धतीने पाहावयाचे, तर शिवाजीने स्वामिद्रोह केलेला आहे. आपल्या आयुष्यात त्याने अनेकदा अनेक शहरे लुटली. सुरतेची लूट प्रसिद्धच आहे. नगर, जुन्नर, कल्याण, भिवंडी, जालना, कारंजा- या शहरांची लूट तितकी प्रसिद्ध नाही. म्हणजे रूढ अर्थाने तो लुटारू व आक्रमकही आहे. हत्या तर त्याच्या हातून रोजच घडल्या. एकीकडे स्वामिद्रोही, लुटारू, आक्रमक, हिंसक असल्या प्रकारची बिरुदावली आहे, दुसरीकडे पाहिले तर त्याने राज्य निर्माण केले, तो स्वत: राजा झाला, त्याने राज्याभिषेक करवून घेतला- असल्या प्रकारचा सगळा

सरंजामशाही परिवेश आहे. यातून नानाविध आरोप व कुत्सितपणा यांचा जन्म होत असतो. त्या साऱ्यांचे उत्तर या ठिकाणी आहे. भारतात कधीही कोणत्याही राजवटीने जनतेत एवढा विश्वास व आत्मीयता निर्माण केली नव्हती. इतिहासकाळात जनतेने कोणालाही ईश्वरी अवतार मानले नव्हते. ज्या कोट्यावधी दडपल्या गेलेल्या, तुडवल्या गेलेल्या जनतेचा प्रतिनिधी म्हणून तो उभा होता, तिचे वैरी-मग ते कोणत्याही जातीचे, धर्माचे असोत- शिवाजीचे स्वामी असूच शकत नाहीत. तो स्वतःला ईश्वरी इच्छेचे वाहन मानत होता. मध्ययुगातील परिभाषेत सांगायचे, तर त्याचा स्वामी सर्व भारतभर पसरलेला होता. सर्व क्रांतिकारकांच्या यशाची अंतिम मान्यता ही असते. त्यांच्या वर्णनाला परिभाषा पुरत नाही.

### कोट्यावधींच्या कल्याणाची स्वप्ने

हे जनतेचे नेतृत्व मध्ययुगात साकार झालेले असल्यामुळे युद्धाला त्यात जास्त महत्त्व आलेले आहे. कारण त्या काळात पापनाशही तलवारीने करावा लागे. पुण्याची स्थापना आणि संरक्षण हेही काम तलवारीचे होते. शिवाजीने उभारलेल्या सर्व उद्योगांतील यशाची किमान अट ही होती की, तो रणमैदानावर यशस्वी ठरला पाहिजे. जर यशस्वी रीतीने तो युद्धात टिकू शकला नसता, तर मग त्या मध्ययुगात उदात्त, मंगल तत्त्वज्ञानांना व्यवहार म्हणून कोणताच अर्थ नव्हता! मी शिवाजीच्या युद्धनेतृत्वाकडे त्याच्या ध्येयवादाचे एक आवश्यक अंग म्हणून पाहतो. युगप्रवर्तक समाजद्रष्टे स्वप्नाळू असतातच; फक्त ते स्वतःच्या सुखाची आणि वैभवाची स्वप्ने न पाहता कोट्यावधींच्या कल्याणाची स्वप्ने पाहतात. जे स्वप्ने पाहतच नाहीत, त्यांना समाज बदलता येत नसतो. पण स्वप्ने पाहणे हा अर्धा भाग असतो; ही स्वप्ने व्यवहारात साकार करणे हा उरलेला अर्धा भाग असतो. जे फक्त स्वप्नेच पाहतात ते फार तर कवी होऊ शकतील, युगप्रवर्तक राष्ट्रनेते होऊ शकणार नाहीत. राष्ट्रनेत्यांना स्वप्ने साकार करण्याची कुवत असावी लागते. शिवाजीचे युद्धनेतृत्व हा ही स्वप्ने साकार करण्याचा कुशल कार्यक्रम होता, ती केवळ रणनीतीची हौस नव्हती. या संदर्भात या युद्धांकडे पाहिले पाहिजे आणि असे पाहताना सैनिकाचे शौर्य व सेनापतीचे शौर्य यांत असणारे मूलभूत अंतर आपण लक्षात ठेवायला पाहिजे.

# ३. यशाचे रहस्य

जो योग बाजी प्रभू देशपांडे, मुरारबाजी आणि तानाजी मालुसरे यांच्यासारख्या पुरुषांच्या वाट्याला असतो, तो योग, म्हणजे रणांगणावर लढताना हौतात्म्य पत्करण्याचा योग, शिवाजीसारख्या पुरुषाला नसतो. शिवाजीसारख्या पुरुषांनी मृत्यूची तयारी नेहमीच ठेवलेली असते. पण हा माणूस मरण्यासाठीसुद्धा मोकळा नसतो; अनेक निष्ठावंतांच्या मरणांवर तो दुःखी अंत:करणाने उभा असतो. जे हजार मरतात ते आपल्या मृत्यूने कृतार्थ होतात. या हजारोंच्या मरणावर उभा असणारा शिवाजी स्वत:च्या मृत्यूने कृतार्थ होऊ शकत नाही. ज्या लक्षावधींच्या मुक्ततेसाठी तो झगडत असतो, त्या जनतेच्या मुक्ती साफल्याने असा नेता कृतार्थ होतो. तो स्वत: मरायला मोकळा नसतो. म्हणूनच सैनिकाचे शौर्य बलिदान करण्यात असते; सेनापतीचे शौर्य नियोजनपूर्वक यश साकार करण्यात असते. सेनापतीला उठाव करावा लागतो. चिवटपणे लढाई द्यावी लागते. प्रसंगी माघार घ्यावी लागते, गप्प बसावे लागते. तडजोड करावी लागते. पुष्कळदा पळावे लागते; शिपायाचे शौर्य लढाई जिंकण्यात अगर मरण पत्करण्यात असते. सेनापतीचे शौर्य युद्ध जिंकून साकार झालेला विजय आपल्या ध्येयवादासाठी राबवण्यात असते. शौर्य या कल्पनेचे हे वेगवेगळ्या पातळींवरील आविष्कार आहेत. ते आविष्कार समजून घेऊनच शिवाजीचे युद्धनेतृत्व समजून घ्यावे लागेल; कारण हे युद्धनेतृत्व ही त्याच्या युगप्रवर्तनाला आवश्यक असणारी किमान अट आहे. म्हणूनच मी रोमांचकारी प्रसंगांना या व्यक्तीच्या अभ्यासात गौण मानतो.

### स्वराज्यनिर्मितीच्या प्रेरणेचा उगम

शिवाजीच्या मनात राज्यनिर्मितीची कल्पना केव्हा व कशी साकार झाली असेल, हे सांगता येणे शक्य नाही. याबाबत अंदाज व्यक्तविणे याला आपल्या मनाचे समाधान करून घेणे यापेक्षा जास्त अर्थ नसतो. लहानपणी जिजाबाईने त्याला रामायण-महाभारताच्या गोष्टी सांगितल्या असतील, तिथून त्याने प्रेरणा घेतली असेल; विजयनगरच्या वैभवशाली साम्राज्याची हकीकत त्याच्या कानांवर आली

असेल, तिथून त्याने प्रेरणा घेतली असेल; दादोजी कोंडदेव याचे शासन चातुर्य त्याने पाहिले असेल, तिथूनही त्याने प्रेरणा घेतली असेल. ज्ञानेश्वर-नामदेवांपासून सर्व साधुसंतांचे पुण्यसंचित त्याच्या पाठीशी उभे होते, तिथून त्याने प्रेरणा घेतली असेल. या सगळ्या कल्पना अंशतः खऱ्या आहेत. प्रेरणा घ्यायची ठरली, तर ती कुठून घ्यावी यासाठी उपलब्ध असणारी ही बाह्य सामग्री आहे; पण या बाह्य सामग्रीतून लाखोंच्यापैकी एकालाच प्रेरणा का मिळते; इतरांना का मिळत नाही, याचे समाधानकारक उत्तर कोण, कसे देणार? शिवाजीला राज्यनिर्मितीची प्रेरणा कशी झाली, हा अनुमानाचा भाग आहे. त्यावर चर्चा करण्यात थोडासा अर्थ आहे. फार अर्थ नाही. ही प्रेरणा झाली केव्हा, हेही अनुमानानेच सांगावे लागेल. इ.स. १६४५ साली जेव्हा छत्रपती फक्त पंधरा वर्षांचे होते, त्या वेळी त्यांनी स्वराज्य निर्मितीची जाहीर शपथ घेतलेली आहे. म्हणजे पंधराव्या वर्षी या शपथेचा जाहीर पुनरुच्चार आहे, पण त्याआधी केव्हा ही कल्पना मनात आली हे कोण सांगणार? अंकुरित झालेले बीज पानांच्या रूपाने प्रथम केव्हा दिसले हे सांगता येते. बीज अंकुरित केव्हा झाले हे आपल्याला काय, प्रत्यक्ष शिवाजीलाही नक्की वेळ, तिथी देऊन सांगता आले नसते.

### व्यवस्थेचा अर्थ

इ.स. १६४२ सालापासून दादोजींच्या नेतृत्वाखाली शिवाजीचा कारभार सुरू होतो. १६४२ ते ४७ या पाच वर्षांत फक्त बारा मावळ ताब्यात घेणे आणि तिथे व्यवस्था लावणे, एवढा एकच उपक्रम चालू असताना दिसतो. हा उपक्रम हे खऱ्या अर्थाने शिवाजीच्या राज्यस्थापनेचे बीज आहे. हे बीज समजून घ्यायचे असेल, तर 'व्यवस्था' या शब्दाचा अर्थ समजून घेतला पाहिजे. या कालखंडात एक काम चालू होते, ते कौल देऊन गाव वसवण्याचे. या आधी कित्येक वर्षे राजकीय अंदाधुंदीमुळे सगळा प्रदेश उद्ध्वस्त व बेचिराख झालेला होता. तिथे लोक आणून वसविणे, गावे स्थिर करणे, जमीन लागवडीखाली आणणे, लोकांना अभय देणे आणि उजाड भाग पुन्हा एकदा उत्पादक व समृद्ध बनविणे, हा व्यवस्थेचा एक भाग आहे. पण हा भाग दिसतो तितका साधा-सरळ मुळीच नाही. लोकांना कौल द्यायचा असेल, तर पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यांना निर्भयपणा वाटला पाहिजे. जमीन नांगरल्यापासून खळे होईपर्यंत सहा महिने शांतता राहील याची हमी द्यावी लागते. ही हमी लोकांना पटावी लागते. लोकांना पेरण्यासाठी नांगर, बैल, व बी-बियाणे द्यावे लागते. त्यांना नवे पीक येईपावेतो जगण्यासाठी धान्य द्यावे लागते, आणि हा सारा दानधर्म नसून पुढच्या दोन-तीन

वर्षांत उत्पन्नातून वळता करून घेण्याचा भाग आहे, म्हणून कर ठरवावे लागतात, फेरवसुली ठरवावी लागते व हे दोन्ही भाग वजा जाता जे उरेल ते शेतकऱ्यांना वर्षभर पुरण्याजोगे राहील याची काळजी घ्यावी लागते. शेतीला एक उपद्रव जंगली जनावरांचा असतो. ती मारण्याची मोहीम काढावी लागते. दुसरा उपद्रव सर्व वतनदारांचा असतो. त्यांची गुंडगिरी मोडून काढावी लागते. आपण सुरक्षित आहोत, आपले जीवित, अब्रू आणि वित्त सुरक्षित आहे, ही भावना निर्माण करावी लागते. हा थोडक्यात व्यवस्थेचा अर्थ आहे.

### पुंड-पाळेकरांचा बंदोबस्त

शिवाजीचे वतनदारांशी भांडण इथूनच सुरू होते. हे भांडण पुढे जन्मभर चाललेले आहे. एक तर हे देशमुख, देशपांडे, वतनदार, मोकासेदार मन मानेल तशी वसुली करत आणि जनतेला लुबाडीत. यामुळे लोक त्रस्त होऊन जात. दुसरे म्हणजे, या वतनदारांच्या गढ्या बळकट असत. त्यांच्याजवळ फौज असे. त्यामुळे ते सत्तेच्या विरुद्ध नेहमी भांडत आणि आपले वतन सुरक्षित ठेवण्यासाठी केव्हाही शत्रूला सामील होत. तिसरे म्हणजे, वतनदारांना स्वत:चे चैन, भोगविलास असत. त्यामुळे स्त्रीची अब्रू सुरक्षित नव्हती. पुरुषाचा स्वाभिमान सुरक्षित नव्हता. आणि हे सारे स्वधर्मीय लोक होते! या पुंड-पाळेकरांचा बंदोबस्त ही एक महत्त्वाची कामगिरी होती. या पाच वर्षांत शिवाजीने जो जनतेचा दुवा घेतला असेल, ती त्याच्या पुढच्या आयुष्यव्यापी कामगिरीची पायाभरणी होती. लोकही मोठे चौकस असतात. जहागीरदाराच्या पोराला आपला त्राता आणि उद्धारकर्ता म्हणून लोक सहजासहजी मान्य करत नाहीत. इ.स. १६४५ साली शिवाजीने राज्यनिर्मितीची प्रकट घोषणा करून पुढचे पाऊल उचलले आहे. ते उचलण्यापूर्वी आपण करू त्या कार्याला बारा मावळातील हजारो लोक उत्साहाने पाठिंबा देतील याची खात्री त्याने करून घेतलेली दिसते.

### खरी रोमांचकारी घटना

या बारा मावळातूनच शिवाजीला शेकडो उत्साही आणि निष्ठावान अनुयायी मिळालेले आहेत. येसाजी, बाजी पासलकर, बाजी प्रभू देशपांडे ही अशा अनुयायांपैकी काही नावे, अतिशय सामान्य घराण्यांतली सर्वसामान्य माणसे शिवाजीने हाताशी धरली आणि त्यांच्यातील प्रचंड सुप्त कर्तृत्व त्याने प्रज्वलित केले. वतनदारांना शिवाजी आपला शत्रू वाटावा, त्यांनी नेहमीच विरोध करण्याचा प्रयत्न करावा, सामान्यांनी शिवाजीला प्रतिसाद द्यावा, या सामान्य मंडळींमधून

असामान्य कर्तृत्वाने शिवाजीचे सहकारी उदयाला यावेत, ही घटना माझ्या दृष्टीने शाहिस्तेखानाची बोटे कापण्यापेक्षा जास्त रोमांचकारी आहे. मोरोपंत पिंगळ्यांसारखा एखादा सामान्य ब्राह्मण, अण्णाजी दत्तोसारखा दूर मराठवाड्यातल्या खेड्यातील कुलकर्ण्यांचा पोर, तानाजी मालुसऱ्यांसारखा किंवा हंबीररावांसारखा एखादा सामान्य मराठा, एका महान क्रांतीचा सामर्थ्यशाली आधार होतो; या घटनेचा आरंभ बारा मावळची व्यवस्था पाहण्यात आहे. या व्यवस्थेमुळे शिवाजी जनतेचा राजा होतो. त्याचे राज्य जनतेचे राज्य होते. तोरणा किल्ला जिंकणे आणि स्वराज्याचे तोरण बांधणे यांतील अनुप्रास चांगला आहे. खरे स्वराज्याचे तोरण मावळच्या व्यवस्थेत बांधले जात होते. तिथे अनुप्रास नाही, याला नाइलाज आहे!

## शिवाजी म्हणजे नव्या व्यवस्थेचा आग्रह

इ.स.१६४५ ते १६४९ हा शिवाजीच्या उठावाचा पहिला काळ आहे. या उठावात रोहिडा, राजगड, तोरणा, सिंहगड, पुरंदर हे किल्ले जिंकणे हा भाग आहेच, पण त्याबरोबरच नव्याने ताब्यात घेतलेल्या प्रदेशांची व्यवस्था लावणे हा दुसरा भाग आहे. पुढे शिवाजी जे करू इच्छित होता त्या दृष्टीने जावळीच्या खोऱ्यात त्याला रस होता. कोणत्याच जुन्या वतनदारांशी शिवाजीचे जुळणे शक्य नव्हते. तसे चंद्रराव मोऱ्यांशीही त्याचे जुळले नाही. हा उद्योग करताना त्याला जवळच्या नातेवाइकांशी सतत भांडावेच लागले. कारण हे नातेवाईक पुन्हा वतनदारांच्यापैकी होते. स्त्रीशी अत्याचारी वागणूक केल्याबद्दल रांझ्याच्या पाटलाचे हात-पाय या कालखंडात तोडण्यात आलेले आहेत. प्रत्येक अत्याचारी पुरुषाच्या अवयवाचा शिवाजीने पाडलेला तुकडा त्याला दहा निष्ठावंत निर्माण करून देत असेल, हे समजून घेऊन आपण 'व्यवस्था' ही कल्पना लक्षात घेतली पाहिजे. शिवाजी म्हणजे युद्ध नव्हे, तर नव्या व्यवस्थेचा आग्रह. ती व्यवस्था अमलात आणण्यासाठी, तिचे रक्षण करण्यासाठी युद्ध हे साधन, नेहमीच साधनाचे मोल समजून घ्यावे, हे इष्ट, पण साध्याचे मोल साधनांपेक्षा निराळे असते, हे समजून घेणे त्याहीपेक्षा इष्ट असते.

## अफझलखानाचा वध

राज्य निर्मितीचा उद्योग बिनधोक असा कधीच नसतो. आपल्या जहागिरीच्या बाहेर पाऊल टाकले की, राजसत्तेपासून हल्ल्याची भीती निर्माण होते. इ.स. १६४५ सालापासून अगदी छोट्या प्रमाणात महाराजांचे कार्य सुरू होते, पण

त्याच वर्षी हा प्रदेश ताब्यात आणण्यासाठी खंडोजी व बाजी घोरपडे हे दोन सरदार आदिलशहाने रवाना केले आहेत. आदिलशाहीने आरंभीच्या काळी शिवाजीकडे दुर्लक्ष केले; हा प्रकार खरा नाही. शहाजी हा पुणे जहागिरीचा जहागीरदार, आदिलशाही दौलतीचा सेवक होता. जोपर्यंत व्यवस्थापनाचे कार्य या जहागिरीच्या आत चालू होते तोपर्यंत आदिलशाहीला त्याची फारशी दखल घेण्याचे कारण नव्हते. आपल्या जहागिरीबाहेर पाऊल टाकताच आदिशाहीने दखल घेतलेली आहे. फार तर असे म्हणता येईल की, धोक्याचा गंभीरपणा त्या वेळी कुणाच्या लक्षात आला नाही. खंडोजी व बाजी घोरपडे यांची स्वारी विफल ठरली. त्यांना पराभूत होऊन परतावे लागले. यानंतर इ.स. १६४६ ला फलटणचे राजे निंबाळकर यांनी शिवाजीला त्रास देण्याचा प्रयत्न केला, तेव्हा निंबाळकरांना पराभूत करणे शिवाजीला भाग पडले! घोरपडे हे दूरचे, पण भावकी, आणि निंबाळकर हे जवळचे सोयरे; असा पहिला संघर्ष आप्तस्वकीयांशीच झालेला दिसतो. यानंतर भोसल्यांचा पाडाव करण्याची मोठी मोहीम हाती घेतली जाते. शहाजीला गफलतीने कैद करणे, एक सैन्य बंगलोर जहागिरीवर वाटे लावणे आणि दुसरे सैन्य शिवाजीवर वाटे लावणे,असा हा तिहेरी प्रकार होता. या तिसऱ्या हल्ल्याच्या वेळी फत्तेखान, बाळाजी हैबतराव ही मंडळी चाल करून आलेली होती. शिवाजीने दोघांचाही पाडाव केला आणि तिसरा विजय मिळविला. यानंतर मोठ्या प्रमाणावर अफजलखानाच्या स्वारीची तयारी होऊ लागली. एक कुशल नियोजक म्हणून शिवाजीचे महत्त्व यात आहे की, त्याने अफझलखानाची स्वारी साकार होऊ दिली नाही!

### युद्धातले तारतम्य

कोणतेही राज्य आरंभीच्या काळात लहानच असते. या वेळपावेतो शिवाजीच्या राज्याचा विस्तार एखाद्या मोठ्या जिल्ह्यापेक्षा लहान होता. अशी छोटी राज्ये आकार मर्यादेच्या दृष्टीने लहान असतात. त्यांची साधनसंपत्ती अपुरी असते. त्यांचे सैनिकसामर्थ्यही लहान असते. एखाद्या मोठ्या युद्धासाठी लागणारी किमान तयारीच या काळात झालेली नसते. अशा छोट्या राज्याला काही आत्मविश्वास यायचा असेल, तर त्याला छोटे छोटे विजय लागतात. हे छोटे छोटे विजय शिवाजीने निंबाळकर, घोरपडे व फत्तेखान यांच्याविरुद्ध संपादन केलेले आहेत. यांपैकी प्रत्येक लढाईत दोन्ही बाजूंकडून मिळून जास्तीत जास्त दोन हजार लोकांनी भाग घेतलेला दिसतो! छोट्या राज्यांना आत्मविश्वास मिळविण्यासाठी असे छोटे विजय महत्त्वाचे असतात आणि तितकीच महत्त्वाची गोष्ट असते, मोठ्या युद्धात गुरफटण्यापासून

स्वत:चा बचाव करणे. न झेपणारी मोठी युद्धे नवीन राष्ट्रांचा कणाच मोडून टाकतात. त्यानंतर पुन्हा उभे राहता येणे अतिशय कठीण असते. आपण बारकाईने विचार केला, तर व्यवहारत: भारत सरकारने पहिली वीस वर्षे हे धोरण अंगीकारण्याचा कसोशीने प्रयत्न केला असे दिसून येईल. कोणत्याही शहाण्या राज्यकर्त्यांचे हेच धोरण असते. अफझलखानाची स्वारी हे मोठे, न पेलणारे युद्ध आहे, हे लक्षात घेऊन शिवाजीने ते टाळले. हे युद्ध टाळण्यासाठी त्याने इ.स. १६४९ ला सिंहगड रिकामा करून दिला. एका पाठोपाठ एक तीन जय मिळाले असताना त्या विजयाने हुरळून न जाण्यात व वेळीच पडते घेऊन मोठे युद्ध टाळण्यात, शिवाजीचे महत्त्वाचे यश दडलेले आहे, हे मान्य करणे कठीण आहे, पण अशा बाबी मान्य करूनच यशस्वी, युगप्रवर्तक नेता समजून घ्यावा लागतो.

### शिवाजीचे यश : लोकांचा विश्वास

सिंहगड रिकामा करून देणे आणि विजापूरकरांशी सलोखा करणे, ही गोष्ट इतक्या दुरून पाहण्याऐवजी थोडी समकालीन नजरेने पाहण्याची आवश्यकता आहे. स्वत: शिवाजीच्या दृष्टीने पाहिले, तर तो सिंहगड रिकामा करून पित्याची सुटका करीत होता, नवी स्वारी होण्याचा धोका टाळीत होता. पण लोकांच्या दृष्टीने पाहिले तर मोठा हल्ला होणार या धास्तीने दिलेली ती शरणागती होती. अशी शरणागती एखादे राज्य देते त्या वेळी काही जणांना भ्रमनिरास झाल्यासारखे वाटत असते. काहींचा विश्वास उडून जातो. मोठा हल्ला होणार या भीतीने जर शिवाजी घाबरून पडते घेत असेल, तर मग हा माणूस आपला उद्धारकर्ता होईल, या लोकांच्या आशेला तडा जाणे स्वाभाविक असते. शिवाजीच्या संघटनकौशल्याचे आणि व्यवस्थापनकौशल्याचे वैशिष्ट्य यात आहे की, वेळोवेळी त्याला पराभव पत्करावा लागला, माघार घ्यावी लागली, अपयश आले. प्रत्येक पराभवात त्याच्या ताब्यातील प्रदेश होरपळून निघाला, पण लोकांचा त्याच्यावरील विश्वास कधी कमी झाला नाही! एखादा-दुसरा चुकार माणूस वजा जाता कधी शिवाजीच्या फौजांनी किंवा त्याच्या प्रजेने त्याच्याविरुद्ध बंड पुकारले नाही! इ.इ. १६४९ साली सारे भवितव्य अनिश्चित असताना लोक विश्वासपूर्वक त्याच्या बाजूने उभे राहिले. यश मिळेल ही त्यांनाही खात्री नसावी, पण अपयश मिळाल्यास तो या मंडळींच्यासाठी सर्वस्वनाश होता, पण त्यांनी हे सतीचे वाण उघड्या डोळ्यांनी स्वीकारलेले होते. शिवाजीच्या शब्दांत सांगायचे तर, 'आमच्या इमानावर मान ठेवून या,' असे त्याचे आवाहन होते. लोकांना हे इमान बिनधोकपणे मान ठेवण्याजोगे वाटले हे त्याचे यश आहे.

## ४. युद्धनेतृत्व

इ.स. १६४९ ते १६५६ ही सात वर्षे मोहिमांच्या दृष्टीने जवळजवळ विश्रांतीची आहेत. नवा प्रदेश ताब्यात घेण्याचा कोणताही प्रयत्न न करता, ताब्यात असणाऱ्या प्रदेशांतच निर्दोष व्यवस्थेची अंमलबजावणी करण्याचे प्रयोग शिवाजीने केले. या सात वर्षांत एकीकडे तो प्रजेची सर्व व्यवस्था लावीत होता, दुसरीकडे आपले युद्धसामर्थ्य क्रमाने वाढवत होता. त्यानंतर उठाव करण्याचा प्रयत्न म्हणजे अफझलखानाच्या स्वारीला आमंत्रण, याची त्याला पूर्ण जाणीव होती. खानाच्या स्वारीला तोंड देण्याची तयारी झाल्याशिवाय पुढच्या हालचालीत अर्थ नव्हता. 'खानाचा हल्ला' या सतत भेडसावणाऱ्या प्रश्नाचे उत्तर शिवाजीने, 'जावळीचे खोरे', असे मनाशी ठरवलेले दिसते. इ.स. १६४६-४७ इतक्या जुन्या काळातही तो जावळीच्या खोऱ्याचा विचार करीत होता. याचे कारण हे आहे की, अफझलखान हा वाईचा सुभेदार होता. आपल्या जाहागिरीबाहेर आदिलशाही प्रदेशात शिवाजी जे आक्रमण करील ते आदिलशाहीच्या राज्यावर आक्रमण होते, तसे प्रामुख्याने अफझलखानाच्या सुभ्यावर आक्रमण होते. खान हा भोसल्यांचा जुना वैरी. आपले पारिपत्य करण्याची जबाबदारी प्रथम खानावर पडणार, हे शिवाजी ओळखून होता. अफझलखानाची स्वारी खानालाही अनपेक्षित नव्हती, शिवाजीलाही अनपेक्षित नव्हती. त्यासाठी विजापूर दरबारमधील विडे उचलण्याच्या प्रसंगाचीही गरज नाही. ज्या सुभ्यात बंड होईल, त्या सुभ्यात असणाऱ्या सुभेदारावर बंडखोरांचे पारिपत्य करण्याची जबाबदारी येऊनच पडते म्हणून आदिलशाही प्रदेशात आक्रमण करायचे, तर अफझलखान हल्ला करणार, मोगल प्रदेशात आक्रमण करायचे, तर त्या वेळच्या दक्षिण सुभ्याचा मोगल सुभेदार आक्रमण करणार, हे गृहीत धरूनच विचार करावा लागतो. भारतीय राजांमध्ये शिवाजी हा असा विरळा राजा आहे की, त्याने सदैव संभाव्य परिणामांचा विचार केला. युद्धाची योजना आखताना भूगोलाचा विचार केला. शत्रुपक्षाकडील प्रत्येक गुप्त बातमी आपल्याला मिळेल याची काळजी घेतली. शिवाजीचे गुप्तहेर खाते आणि युद्धाचे भौगोलिक नियोजन हा त्याच्या युद्धनेतृत्वाचा महत्त्वाचा भाग आहे. जावळीचे

खोरे जिंकल्याशिवाय 'अफझलखान' या प्रश्नाला उत्तर नव्हते आणि जावळीचे खोरे जिंकणे सोपे नव्हते. आक्रमणाला अत्यंत प्रतिकुल रणभूमी हेच तर जावळीचे वैशिष्ट्य आहे.

### जावळीवर कब्जा

सात वर्षेपर्यंत शिवाजी जनतेचे बळ आपल्या मागे उभे करत होता. फौजेचे बळ वाढवत होता आणि सतत योग्य संधीची वाट पाहत होता. ही योग्य संधी इ.स. १६५६ मध्ये त्याला मिळाली. १६५६ साली आदिलशाही गादीवरील राजा आजारी पडलेला होता. त्यामुळे आदिलशाहीत सर्वत्र गोंधळ चालू होता. स्वत: अफझलखान हा कर्नाटकाच्या लढाईत गुंतलेला होता. त्यामुळे तो वेगाने जावळीकडे लक्ष देऊ शकत नव्हता. मोगलांचा दक्षिण सुभेदार औरंगजेब हा आदिलशाही राज्य संपवण्याच्या दृष्टीने हालचाल करत होता. त्यामुळे आदिलशाहीला आपले अस्तित्व टिकवण्याचीच चिंता होती. त्यांना शिवाजीकडे लक्ष देण्यास वेळ नव्हता. ही संधी साधून मोठ्या वेगाने शिवाजीने जावळी ताब्यात घेतली. जावळी ताब्यात घेतल्यानंतर लवकरच केव्हा तरी पुन्हा एकदा त्याने सिंहगड ताब्यात घेतलेला दिसतो. जावळी ताब्यात घेणे आणि सिंहगड ताब्यात घेणे म्हणजे आदिलशाहीला जाहीर आव्हान दिल्यासारखेच होते. यानंतर उसंत सापडल्याबरोबर प्रचंड शक्तीनिशी अफझलखान हल्ला करणार, ही गोष्ट ठरल्यासारखी होती. मात्र मोगलांच्या भीतीतून आदिलशाहीची मुक्तता केव्हा होईल हे अनिश्चित होते. त्यामुळे जी उसंत सापडली तिचा वापर शिवाजीने जावळीच्या खोऱ्यात आपली व्यवस्था रुजवण्यासाठी केला. शिवाजीला यासाठी जो दीड-पावणेदोन वर्षांचा काळ मिळाला, तो मिळाल्यानंतर जावळीच्या दुर्गम खोऱ्यात प्रत्येक माणूस हे राज्य टिकले पाहिजे या दृष्टीने पेटून उठला असला पाहिजे, हे सांगण्याची गरज नाही.

### वाढती युद्धक्षमता

जावळी जिंकल्यामुळे विजापूरकरांचा मोठा हल्ला होणार हे निश्चित होते. शिवाजीच्या नेहमीच्या पद्धतीनुसार त्याने लगेच पुढच्या वर्षी सुपे परगणा ताब्यात घेतला आणि आपला मामा संभाजी मोहिते याचा पराभव केला. आपल्या ताब्यातील प्रदेश वाढवत त्याने समुद्रापर्यंत सीमा भिडवल्या. उद्या कदाचित गरज पडली, तर जावळीखेरीजचा प्रदेश निमूटपणे सोडून देऊन तह करण्याची त्याने पूर्वतयारी केली. हे शिवाजीचे नेहमीचे वैशिष्ट्य आहे. तो जेव्हा

विजयी होतो. तेव्हा नवा प्रदेश ताब्यात घेतो. ज्या वेळेला तो पडते घेऊन काही प्रदेश सोडून देतो त्या वेळी नव्याने जिंकलेल्या प्रदेशाचा काही भाग तो सोडून देतो आणि जेव्हा दारूण पराभवाच्या उंबरठ्यावर तो उभा असतो त्या वेळी मोठा प्रदेश सोडला, तरी त्याची लढण्याची शक्ती त्याने पुन्हा सुरक्षित ठेवलेली असते. या पद्धतीनेच तो जन्मभर वागत राहिला. म्हणून त्याचे राज्य नेहमी विजयाने वाढले; पराभवापूर्वीच्या तडजोडींनी काही प्रमाणात वाढलेच आणि प्रचंड पराभवाच्यानंतरसुद्धा त्याची युद्धक्षमता वाढली.

### शिवाजी व औरंगजेब

इ.स. १६५६ पासून शिवाजीच्या जीवनातला नवा अध्याय सुरू होतो. खऱ्या अर्थाने आदिलशाहीला जाहीर असे मोठे आव्हान याच वेळी त्याने दिलेले आहे. मोगल आणि आदिलशहा परस्परांशी लढण्यात गुंतलेले आहेत. आपल्याकडे तातडीने लक्ष देणे कुणालाच शक्य नाही, हे लक्षात घेऊन शिवाजीने औरंगजेबाशीसुद्धा बोलणी चालू केली व ही बोलणी चालू असतानाच जुन्नर, नगर, कल्याण, भिवंडी या ठिकाणी मोगल प्रदेशात त्याने हल्ले करून या तिन्ही पेठा लुटल्या. समजा, जर आदिलशहा आणि मोगल या युद्धात आदिलशाहीचा पूर्ण पाडाव झाला, तर शिवाजीकडे लक्ष देण्यास मोंगलांना वेळ मिळण्यासाठी अजून वर्ष-दोन वर्षे अवधी होता; आणि जर आदिलशाही त्या हल्ल्यातून बचावली, तर आदिलशहाला वाचवण्यासाठी आपण मोगल प्रदेश लुटून त्रस्त करत होतो, हे सांगण्यास शिवाजी मोकळा होता. शहाजहानच्या आजारीपणामुळे १६५८ ला औरंगजेब घाईघाईने दिल्लीला निघून गेला. शिवाजीनेही तातडीने औरंगजेबाशी सलोखा केला. त्याच्या मंचकारोहणाला नजराणा पाठवणाऱ्यांत शिवाजी एक होता! औरंगजेबाने परिस्थिती जाणून शिवाजीशी सलोखा केलेला असला, तरी शिवाजीचा खोडसाळपणा औरंगजेब कधी क्षम्य मानणे शक्य नव्हते. शाहिस्तेखानाची स्वारी अप्रत्यक्षपणे या प्रकरणातून उद्भवते.

### मनोरंजक भ्रमातून बाहेर पडले पाहिजे

औरंगजेब दिल्लीला परतल्यामुळे आणि मोगल-आदिशहाचा तह झाल्यामुळे आदिलशाहीला १६५९ च्या आरंभी उसंत मिळाली आणि ही उसंत मिळाल्याबरोबर लगेच पुढल्या तीन-चार महिन्यांत खानाच्या स्वारीची तयारी सुरू झाली. प्रत्यक्षात अफझलखानाची स्वारी १६५९ च्या उत्तरार्धातील आहे,

पण ती अशा प्रकारे ८-९ वर्षे गाजत असलेली जुनी घटना आहे. या वेळी शिवाजी पूर्ण तयारीत होता. रणांगणावर एका वेळी चार-पाच हजार लोक उभे करता येतील; ही त्याची या क्षणी शक्ती होती. जावळीसारखे दुर्गम खोरे त्याच्या ताब्यात होते. ही किमान तयारी झाल्यानंतर तो आता अफझलखानाच्या फौजांचे स्वागत करण्यास तयार होता! याही वेळी समोरासमोर खानाशी लढाई देण्याची शिवाजीची शक्ती नव्हतीच, पण आवश्यक ती पूर्वतयारी झालेली होती. येथून शिवाजी खानाला फौजांच्यानिशी जावळीच्या खोऱ्यात आणण्यास प्रयत्नशील राहिला. अफझलखान कसलेला योद्धा होता. तो कुशल सेनानी होता, तसा कपटपटू होता आणि रणमैदान त्याच्या ओळखीचे होते. कारण तो त्याच्याच सुभ्याचा भाग होता. त्यामुळे शिवाजीला जावळीच्या खोऱ्यातून बाहेर काढणे, यासाठी खान प्रयत्नशील राहिला. रोमांचकारी घटनांच्या नादी लागून अफझलखान म्हणजे कुणीतरी गर्विष्ठ, बेसावध आणि प्रदेशाला अपरिचित पठाण होता व भलत्या आत्मविश्वासापायी तो फसला व मारला गेला, अशी समजूत आपण करून घेतली आहे. तो मनोरंजक भ्रम आहे, हे पुन्हा सांगणे आवश्यक आहे.

### तर मग ईश्वरभजन करणे रास्त ठरले असते!

अफझलखानाच्या वधाचा प्रसंग आला म्हणजे प्रमुख चर्चा एका निरर्थक मुद्द्याभोवती घोटाळते. तो निरर्थक मुद्दा म्हणजे असा की, प्रथम दगा कुणी दिला? खानाने प्रथम दगा दिला आणि मग महाराजांनी त्याला धडा शिकवला, हे सिद्ध करण्यासाठी आजवर पुष्कळ बुद्धी खर्च पडली आहे! खरे म्हणजे आपण प्रश्न असा विचारायला हवा होता की, समजा, खानाने शिवाजीला दगा दिला नसता, तर दोघांची सरळ भेट झाली असती. यानंतर खान सुरक्षितपणे परतला असता. पुढे काय झाले असते? कारण पुढच्या भेटीसाठी शिष्टाचार म्हणून खानाच्या फौजी गोटात जाऊन त्याची भेट घेणे शिवाजीला भाग होते. या मार्गाने जर शिवाजी वागला असता, तर मग त्याने टाळ, मृदंग हाती घेऊन ईश्वरभजन करणेच अधिक रास्त ठरले असते! राज्यनिर्मितीसारखी गुंतागुंतीची क्रिया इतक्या भोळ्या माणसाला जमत नसते. दगा कुणी दिला. हा प्रश्नच निरर्थक आहे. प्रतापगडच्या पायथ्याशी आलेला खान जिवंत परत जाणे शक्य नव्हते, हे आपण एकदा समजून घेतले पाहिजे. याचा खान कसा वागला याच्याशी संबंध नसून पुढच्या ध्येयवादाशी आणि मागच्या इतिहासाशी याचा संबंध आहे.

## खानाचे डावपेच

अफझलखान आणि भोसले यांचे जुने वैर होते. इ.स.१६४८ साली शहाजीराजांना विश्वासघाताने अटक करण्यात व पुढे त्यांच्या पायांत बेड्या घालून त्यांना विजापुरी नेण्यात खानाचा पुढाकार होता. शिवाजीचा वडील भाऊ संभाजी याच्या मृत्यूशी खानाचा अप्रत्यक्ष संबंध होता. भेटीला राजे बोलावून त्यांना दग्याने ठार करणे, हाही खानाचा इतिहास होता. कस्तुरीरंगा असाच मारला गेला होता. हा इतिहासच हे घोषित करत होता की, प्रतापगडाच्या पायथ्याशी आल्यानंतर खान जिवंत परत जाणे शक्य नाही! अफझलखानाने आपल्या स्वारीची योजना व्यवस्थितपणे आखलेली होती. त्याने शिवाजीच्या राज्यावर एकदम सर्व बाजूंनी आक्रमण सुरू केले होते. सुपे, शिरवळ, सासवड, पुणे, तळकोकण- अशा सर्व बाजूंनी शिवाजीच्या राज्यात एकदम फौजा घुसवणे आणि राज्यभर एकच गोंधळ उडवून देणे हा खानाचा हेतू होता. जेव्हा प्रदेश बेचिराख केले जातात त्या वेळी राजांना मैदानात येऊन लढावेच लागते. नाहीतर आपल्या सर्व यातनांना कारणीभूत होऊन सुरक्षित झालेल्या व सुरक्षितपणे बसलेल्या राजांच्याविषयी प्रजेच्या मनात तीव्र द्वेषभावना निर्माण होते. खानाचा प्रयत्न सरळ होता. शिवाजीला जावळीच्या खोऱ्यातून बाहेर काढणे आणि मैदानी लढाईत नेस्तानाबूत करणे. आणि जर या क्रियेला उशीर लागत असेल, तर जनतेच्या मनातील शिवाजीविषयीचे श्रद्धेचे चित्र नष्ट करणे आणि जनतेला शिवाजी तिरस्कारार्ह वाटेल याची सोय करणे, तिच्यात जागी झालेली उठावाची प्रेरणा नष्ट करणे. आपल्या बाजूने खानाने पाऊल योग्य उचलले होते. पुढे मिर्झा राजा जयसिंग यांनीही शिवाजीविरुद्ध लढताना याच धोरणाचा अवलंब केला.

## शिवाजीचे कुशल नियोजन

शिवाजीचेही धोरण अगदी स्पष्ट होते. किल्ल्यांवर आत्मरक्षणापुरती फौज ठेवून, त्याने इतर फौजा जावळीच्या खोऱ्यात आणलेल्या होत्या. खानाचे लोक जर किल्ल्यांना वेढे देऊन बसतील तर दीर्घकाळ किल्ले लढवता यावेत याची सोय त्याने केलेली होती. त्या दृष्टीने सिंहगडावर युवराज, मातोश्री आणि काही प्रमुख लोक यांचा मुक्काम होता. आपण स्वत: मात्र तो जावळीच्या खोऱ्यात बसलेला होता. खानाला जावळीच्या खोऱ्यात आणायचे, हा शिवाजीचा हेतू - अफजलखान मारण्यासाठी म्हणून नव्हता. अफझलखान तर मारायचा होताच - पण एका भव्य योजनेतील तो एक छोटासा भाग होता. खान कितीही मोठा माणूस असला व महत्त्वाचा असला, तरी शेवटी एक माणूस होता. माणसांची

आदिलशाहीजवळ उणीव नव्हती आणि माणूस मारून शिवाजीला फारसा मोठा लाभही नव्हता. शिवाजीची धडपड फौजांच्यानिशी खानाला प्रतापडाच्या पायथ्याशी आणून फौजेसह नष्ट करण्याची आणि या युद्धविजयाचा दूरगामी लष्करी फायदा घेण्याची होती. जिथे नियोजन चालू होते, बारा हजारांच्या फौजांच्यासकट खान नष्ट करण्याचे, त्या नियोजनात खान जिवंत वाचू नये हे गृहीत होतेच. प्रत्यक्ष भेटीत खान कसा वागेल हा अगदीच किरकोळ आणि बिनमहत्त्वाचा मुद्दा होता. वीरगाथा गाणारे पोवाडेकार पोवाडे रचतात हे खरे आहे. पोवाडे आवडतात, ते आवडावेत, पण त्यामुळे राजकारणाचे रहस्य नजरेआड होऊ नये. या प्रसंगातील खानवध ही टाळ्या वाजवण्याची जागा तुलनेने गौण आहे.

शिवाजीने अफझलखानाला कोणती आश्वासने दिली, त्याची खात्री कशी पटवून दिली, ही खात्री पटवून देताना त्याने कोणत्या युक्त्या वापरल्या हा तपशील आपल्याला कळण्याची कधी शक्यता नाही. याबाबतचा वृतान्त बखरकार सांगतात, ते ऐतिहासिक सत्य म्हणून स्वीकारता येण्याजोगे नाही. सत्य हे आहे की, अफझलखान भेटीला तयार झाला. तसा तो बेसावध नव्हताच. त्याने फौजेचा काही भाग जावळीच्या खोऱ्याबाहेर वाईला ठेवला. प्रचंड फौजा घेऊन तो जावळीच्या खोऱ्यात उतरला. पुष्कळसे सैनिक त्याने प्रतापगडाच्या पायथ्याशी ठेवले आणि मगच तो शिवाजीच्या भेटीला गेला. शिवाजीनेही आधीच पूर्वतयारी केलेली होती. गडावर आलेल्या मंडळींना कापून काढण्याची स्वतंत्र सोय होती. पायथ्याशी उभ्या असणाऱ्या सैन्यावर अचानक घाला घालण्यासाठी स्वतंत्रपणे मोरोपंत पिंगळे आणि नेताजी पालकराची रचना होती. महिनोगणती तपशीलवार रचना करून ठराविक ठिकाणी, ठराविक दिवशी, शत्रूला आणण्याची व त्याच्या संपूर्ण नाशाची योजना आखायची, ती त्याला परत जाऊ देण्यासाठी नसते. ठरल्याप्रमाणे खान मारला गेला, जावळीच्या खोऱ्यातील त्याच्या प्रचंड फौजांचा पराभव झाला. ही घटना १० नोव्हेंबर १६५९ ची आहे.

### एका वैभवशाली प्रयोगाचा प्रारंभ

अफझलखानाच्या वधामुळे शिवाजी बेसावध झाला नाही. या ठिकाणी मिळालेल्या प्रचंड लुटीमुळे त्याने वेगाने मोठी सेना उभी केली. शिवाजीचे घोडदळ तीन हजारांहून सात हजारांवर गेले. तातडीने हल्ला करून त्याने वाई येथील फौजेचा पराभव केला. अवघ्या अठरा दिवसांत शंभर मैल दौड करून

पन्हाळगड जिंकला आणि डिसेंबर अखेर कोल्हापूर नजीक रुस्तुमजमाचा पराभव करून विजापूरकरांचा दुसरा हल्ला परतवला. बारा हजारांच्या फौजेनिशी खान गारद करणे, मिळालेली लूट फौजा दुप्पट करण्यात वापरणे, आणि या प्रचंड पराभवाच्या धक्क्यातून आदिलशाही सावरली जाण्यापूर्वी शक्य होईल तेवढा नवा प्रदेश जिंकणे, हे सैनिकी कौशल्य आणि त्यामागचे नियोजन महत्त्वाचे आहे. अफजलखान नावाचा माणूस मारणे या नाट्यमय घटनेचे महत्त्व नाटकापुरते असते. या ठिकाणी शिवाजीचे चौरस नियोजन व युद्धजयाला दृढपणे राज्यविस्तारात रूपांतरित करण्याचे कौशल्य पणाला लागलेले दिसते. शिवाजीने प्रजेत असंतोष निर्माण करण्याच्या खानाच्या युक्त्या विफल करून टाकल्या. सर्व भारताचे लक्ष आपल्याकडे खेचले व सर्व भारतीय राज्यकर्त्यांनी भयचकित होऊन आपल्या अवताराकडे पाहावे, अशी कीर्ती उदयाला आणली. अफझलखान या प्रश्नाला जावळी हे उत्तर शिवाजीने कल्पनेत रचले होते. ते व्यवहारात साकार केले. इथून एका वैभवशाली प्रयोगाला सुरुवात होते. हा अखिल भारतीय कर्तृत्वाचा पहिला बहर आहे. त्याचे कडू-गोड परिणाम सर्वांनाच चाखणे भाग होते.

### अखिल भारतीय महत्त्व

इ.स. १६४५ साली छत्रपतींनी ज्या कार्याला प्रारंभ केला, त्याच ध्येयवादाच्या दिशेने इ.स. १६५९ सालीही त्यांचे वर्तन चाललेले होते. शिवाजी महाराजांच्या दृष्टीने या दोन ठिकाणांत अंतर काहीच नाही, पण उरलेल्या हिंदुस्थानच्या दृष्टीने या दोन ठिकाणांत अतिशय महत्त्वाचे अंतर आहे. इ.स. १६४५ साली एखादा किल्ला जिंकणे, बारा मावळची व्यवस्था पाहणे या घडामोडी, इतरांच्या दृष्टीने पाहिल्या, तर किरकोळ आणि स्थानिक स्वरूपाच्या होत्या. सर्व भारताने या घटनांमध्ये लक्ष द्यावे असे त्यात काहीच नव्हते. आज आपण पुढचा प्रचंड विस्तार पाहून या घटनेचे महत्त्व ओळखू शकतो. समकालीनांना या घटना अशाच जाणवण्याचे कारण नव्हते. इ.स. १६५९ साली झालेला अफझलखानाचा वध ही स्थानिक घटना नसून समकालीनांच्याही दृष्टीने ती अखिल भारतीय राजकारणाला हादरा देणारी भारतव्यापी महत्त्वाची गोष्ट होती. भारतातील नेत्यांना एक नवे युग सुरू होत आहे याचे भान आणून देणारी होती. ही भारतातील सर्व अन्यायपीडित जनतेला आपला मुक्तिदाता उदयाला आला आहे, असा दिलासा देणारी होती. इ.स. १६५९ साली जो खानवध होतो त्याची तयारी शिवाजीच्या चरित्रात इ.स. १६५६ पासून सुरू आहे. त्याहीपूर्वी

इ.स. १६४९ पासून या प्रश्नाची जाण आहे, पण प्रतिस्पर्धी राजसत्तांना इ.स. १६५९ पूर्व धक्का बसण्याचे कारण नव्हते. या वर्षी नोव्हेंबर महिन्यात अफझलखान आपल्या बारा हजारांच्या फौजेनिशी गारद होतो! जानेवारी १६६० पासून शिवाजी या माणसाचे रूप घेऊन साकार झालेली शक्ती एक अखिल भारतीय महत्त्वाची घटना म्हणून सर्वांच्या डोळ्यांसमोर नांदू लागते.

**खरा प्रतिस्पर्धी औरंगजेब**

शिवाजी महाराजांच्या काळी म्हणजे त्यांच्या राजकीय उदयाच्या काळी आदिलशाही काय किंवा कुतुबशाही काय, या सत्ता ऱ्हासाच्या शेवटच्या अवस्थेत पोहोचलेल्या नव्हत्या. मध्ययुगात राजदरबारात नेहमी असणारी कटकारस्थाने होती. त्यामुळे माणसांची अदलाबदल होत असे. पण गरजांनुसार एक लाखांचे खडे सैन्य एका वेळी एका रणांगणावर उभे करणे, या दोन्हीही सत्तांना शक्य होते. अफझलखानाचा वध म्हणजे आदिलशाहीच्या शक्तीचा ऱ्हास नव्हे किंवा आदिलशाही शक्तीचा शेवटही नव्हे. आदिलशाहीचा शेवट शिवाजीच्या मृत्यूनंतर सात-आठ वर्षांनी औरंगजेबाने केला. त्याही वेळी औरंगजेबाला प्रदीर्घ असा लढा द्यावा लागलेलाच होता. खानवधाचे महत्त्व आदिलशाहीला एक जोरदार धक्का इतकेच आहे. शिवाजीच्या दृष्टीने आत्मविश्वासाची अनेकपट वाढ आणि फौजांची दुप्पट-तिप्पट वाढ हे या घटनेचे महत्त्व आहे. शिवाजीमहाराजांचे खरे भांडण आदिलशाही आणि कुतुबशाही या सत्तांशी नव्हतेच. आदिलशाहीचा प्रदेश ताब्यात घेण्यापासून त्याच्या उठावाला आरंभ होतो हे खरे असले, तरी या अखिल भारतीय दृष्टिकोण असणाऱ्या पुरुषाचे खरे प्रतिस्पर्धी शासन मोगलच होते. याचा योग्य इशारा १६५७ लाच छत्रपतींनी नगर, जुन्नर, भिवंडी लुटून दिलेला होता. ही मोगलांची राजसत्ता आपल्या वैभवाच्या आणि शक्तीच्या मध्यान्ह काळी होती आणि तिचे नेतृत्व आलमगीर औरंगजेबासारखा चाणाक्ष, मुत्सद्दी आणि चौरस दृष्टिकोण असणारा एक कुशल राज्यकर्ता करत होता.

# ५. जयगाथांची भव्य मालिका

ज्या दिवशी भारतीय राज्यकर्त्यांच्या कर्तृत्वाची आपण यादी करू, त्या दिवशी औरंगजेबाची गणना अव्वल दर्जाच्या श्रेष्ठ शासकांत आपल्याला करावी लागेल. तो स्वत:ला जेता समजणाऱ्या गटाचा सर्वश्रेष्ठ नेता होता आणि म्हणून एतद्देशीयांच्या सत्तेचा समर्थक शिवाजी याचा सर्वात मोठा प्रतिस्पर्धी होता. एवढी एक गोष्ट सोडल्यास आलमगिराजवळ राजकीय नेत्याला लागणाऱ्या कोणत्याच गुणांची उणीव नव्हती. शिवाजी म्हणजे काय? या प्रश्नाचा खरा अर्थ त्याच्या विरोधकांत फक्त आलमगीर औरंगजेबाला कळलेला दिसतो. अफझलखानाच्या वधाच्या धक्क्यातून सावरल्यावर आदिलशाहीने तातडीने पुढील हालचालींना आरंभ केला. अशी तातडीची हालचाल आदिलशाहीला करणेच भाग होते. आपण अफझलखान मारला, या आनंदात जर शिवाजी मशगूल राहण्यास तयार असता, तर एक वेळ त्याच्याकडे दुर्लक्ष करता आले असते, पण शिवाजी हा सतत नवा प्रदेश आपल्या वर्चस्वाखाली आणणारा एक अजस्त्र पाणलोट ठरू पाहत होता. त्याने तातडीने पन्हाळा ताब्यात घेतला. देश आणि कोकणात स्वाऱ्या काढल्या. विजापूरजवळच्या प्रदेशात मराठ्यांच्या फौजा फिरू लागल्या. अतिशय तातडीने आदिलशाहीने पाऊल उचलले नाही, तर त्या राजसत्तेच्या अस्तित्वालाच धोका निर्माण होण्याचा संभव होता म्हणून आदिलशाहीला वेगाने हालचाल करणे भागच होते. त्या दृष्टीने आदिलशाहीने तातडीने कर्नुलचा सुभेदार सिद्दी जोहर याला महाराजांच्याविरुद्ध पाठवले. सिद्दी जोहरबरोबर नक्की फौज-फाटा किती होता, हे सांगता येत नाही. कारण प्रत्येकाने आकडे निराळे दिलेले आहेत. पण १५ हजारांचे घोडदळ व इतर २५ हजार पायदळ असा किमान आकडा गृहीत धरायला हरकत नाही. हा आकडा किमान आहे; म्हणजे प्रत्यक्षात फौजांची संख्या याहून अधिक असली पाहिजे. अफझलखानाच्या वधामुळे पूर्वीपेक्षा तिप्पट मोठे आक्रमण शिवाजी महाराजांच्यावर ओढवले, हे लक्षात घेतले तर आदिलशाहीचे त्या वेळचे लष्करी सामर्थ्य कळू शकेल. त्याबरोबरच शिवाजीला आता अखिल भारतीय महत्त्व आले होते, हेही चटकन लक्षात येऊ शकेल. खानवध आणि

पन्हाळगडचा वेढा या परस्परभिन्न अशा सुट्या घटना नाहीत. सिद्दी जोहर हे खानवधाला आदिलशाहीने दिलेले उत्तर आहे. अफझलखानाचा वध व बाजी प्रभू देशपांड्यांची आत्माहुती या त्या विशाल राजकारणातील एका नाण्याच्या दोन बाजू आहेत. त्या दोन वेगवेगळ्या पातळीवरच्या जयकथा आहेत. एके ठिकाणी शिवाजीचा जय हा शत्रूच्या नाशामुळे साकार होतो. दुसऱ्या ठिकाणी एवढी प्रचंड बलिदानाची प्रेरणा आपण जागी केली आहे हे सिद्ध करू शकतो. हा त्या ध्येयवादाचा अकलंकित विजय आहे. आत्माहुती आणि बलिदान यांची कहाणी शोकांतिका नसते, ती पिढ्यान् पिढ्या गाइली जाणारी वीरपुरुषांची जयगाथा असते. छत्रपतींच्या कर्तृत्वामुळे अशा अनेक जयगाथांचा उदय झालेला आहे. बाजी प्रभू, मुरारबाजी, तानाजी मालुसरे हे या प्रदीर्घ महाकाव्यसदृश जयगाथेचे स्वतंत्र सर्ग आहेत. यांतला प्रत्येक सर्ग ही एक प्रेरणा देणारी जयगाथा आहे.

सिद्दी जोहरने महत्त्वाची घटना कोणती घडवून आणली असेल, तर ती म्हणजे पन्हाळगडावर शिवाजी असताना या गडाला वेढा देण्यात त्याने यश मिळवले! अफझलखानाला स्वतःचे रणांगण कधी निवडता आले नव्हते. शिवाजीने निवडलेल्या रणांगणावर त्याला नाइलाजाने यावे लागले. सिद्दी जोहरने आपल्या स्वतःला सोईचे रणांगण निवडले होते आणि तिथे शिवाजीला अडकून पडणे भाग होते! पन्हाळगड हा महत्त्वाचा किल्ला असला, तरी ती जावळीची दुर्गम भूमी नव्हे आणि हा शिवाजीने नव्याने विजित केलेला प्रदेश म्हणून त्या भागात अजून प्रत्येकाच्या अंतःकरणात शिवाजी रुजलेलाही नव्हे. या नव्या प्रदेशात शिवाजीला ऐन मार्च महिन्यात घेरणे यात सिद्दी जोहरचे यश होते. जर पुढच्या दोन-तीन महिन्यांत त्याला पन्हाळगड जिंकता आला असता, तर पावसाळा संपेपर्यंत मराठ्यांना नवी महत्त्वाची हालचाल करता येणे शक्य नव्हते. सिद्दी जोहरने अतिशय चतुरपणे पन्हाळ्याला वेढा घालतानाच शेजारच्या विशाळगडालाही वेढा घातलेला होता आणि हा वेढा फोडण्याचे मराठ्यांचे सर्व प्रयत्न वाया जावेत, अशी त्याने काळजीही घेतली होती. त्याने जणू नवीन उमलणाऱ्या सत्तेचा गळा आपल्या पकडीत घेतला होता. शिवाजीला या वेढ्यातून सोडवणे मराठ्यांच्या ताकदीच्या बाहेरचे होते. या दृष्टीने त्यांनी केलेले सारे प्रयत्न वाया गेलेले होते. सिद्दी जोहरला त्याच्या कौशल्याचे श्रेय मोकळेपणाने दिले पाहिजे.

## विजापूर ते दिल्ली हादरा

याच वेळी शिवाजी महाराजांचा एक अंदाज चुकला. त्यांचा आणि मोगलांचा सलोखा झालेला होता. मोगलांना आपली चुणूक दाखवून त्यांनी तातडीने तडजोड केलेली होती. मोगलांशी कोणताही भांडणाचा नवा प्रसंग येऊ नये याविषयी ते दक्ष होते. आलमगीर मनातून आदिलशाहीचा विरोधक आहे, आदिलशाही जितकी खिळखिळी होईल तितकी त्याच्यासाठी समाधानाची बाब आहे, म्हणून कारण घडल्याशिवाय औरंगजेब आपल्याला अडथळा करणार नाही हा त्यांचा होरा होता. छत्रपतींनी औरंगजेबाचा अंदाज बांधण्यात या एकाच वेळी चूक केली! पुन्हा आयुष्यात त्यांच्याकडून असल्या प्रकारची चूक घडली नाही. शिवाजी महाराजांची या ठिकाणची चूक म्हणजे बेसावधपणा आणि गाफिलगिरी नव्हे. ते सावध होते. चूक असेल तर ती या ठिकाणी आहे की, आपल्या कार्याचा अन्वयार्थ औरंगजेब, धक्के बसून आदिलशाही दुबळी होणे असा लावील, हे त्यांचे अनुमान चुकले. शिवाजी म्हणजे आदिलशाहीचे मूळ गदगदा हलवून कच्चे करणारा एक जहागीरदार असे औरंगजेबाने समजावे, ही त्यांची इच्छा होती; पण शिवाजी म्हणजे एतद्देशीयांच्या वतीने सर्व जेत्यांना आव्हान, हे आलमगिराने चटकन ओळखले! अफझलखानाचा वध नोव्हेंबरमध्ये झाला, या वार्तेचा तपशील डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यात आलमगीरापर्यंत पोचला आणि शिवाजीच्या कृत्याचा योग्य अर्थ लक्षात घेऊन त्याने तातडीने दक्षिणेच्या सुभेदाराला मराठ्यांच्या राज्यात घुसण्याची आज्ञा दिली. त्या काळात दक्षिणेतील बातम्या आग्र्याला पोचण्यास पंधरा-वीस दिवस सहजच लागत. तिथून आज्ञा येण्यास अजून पंधरा-वीस दिवस जात. हल्ल्याची तयारी करून फौजा प्रत्यक्ष कूच करीपावेतो पुन्हा दोन-तीन आठवडे जात. हा त्या काळातील गतीचा सामान्य क्रम लक्षात घेतला, तर २१ जानेवारीला मराठ्यांच्या राजावर स्वारी करणे हे आलमगीराने उचललेले तातडीचे पाऊल आहे हे लक्षात येईल. जवळच्या विजापूरहून शिवाजीचा बंदोबस्त करण्यासाठी निघालेला सिद्दी जोहर मार्चमध्ये पन्हाळगडावर आला, त्याआधी दूरच्या दिल्लीच्या आज्ञेने फेब्रुवारीतच शाहिस्तेखान पुणे प्रांतात शिरलेला होता. सिद्दी जोहर ही खानवधाला आदिलशाहीची प्रतिक्रिया होती. शाहिस्तेखान ही याच घटनेला मोगलांची प्रतिक्रिया होती. याचा अर्थ असा की, प्रतापगडाच्या पायथ्याशी अफझलखान मारला गेला, तेव्हा विजापूर ते दिल्ली एवढ्या सगळ्या भागाला हादरा बसला.

### शिवाजीबद्दल जनतेची अभंग निष्ठा

अफझलखानाच्या वधामुळे मराठ्यांच्या राज्यावर एक प्रचंड संकट कोसळले. जवळपास साठ हजारांच्या फौजा घेऊन मैदानात उतरलेला शाहिस्तेखान हा मराठ्यांच्या फौजांना मैदानी लढाईत पराभूत करण्यासाठी अशक्य असणारा एक घटक होता. तीस-चाळीस हजारांचा जमाव घेऊन पन्हाळगड, विशाळगडाला वेढा देऊन बसलेला सिद्दी जोहर हा हालवता न येणारा दुसरा प्रचंड घटक होता. या राक्षसी शक्तींच्या ओझ्याखाली मराठी राज्य एकदम चिरडले गेले आणि प्रत्यक्ष राजेच शत्रूच्या विळख्यात अडकले! हा अफझलखानवधाचा तातडीने घडलेला परिणाम आहे. एवढे ओझे राज्यावर असतानाही बहुतेक किल्ले बेलाग राहिले आणि सर्व प्रदेश जाळून-पोळून वर्षानुवर्षे उद्ध्वस्त केले तरी जनतेच्या मनातील शिवाजीविषयीची निष्ठा अभंग राहिली! इ.स. १६५९ ला अफझलखानाने जमेल तो प्रदेश दोन-तीन महिने उद्ध्वस्त करण्याचा प्रयत्न केला. इ.स. १६६० ते ६३ हाच उद्योग शिवाजीच्या राज्यात शाहिस्तेखानाने चालू ठेवला. १६६५ ला या सर्व उद्योगांत मिर्झा राजे जयसिंगाने नवीन भर घातली आणि नंतर सुमारे इ.स. १६७० पर्यंत यातील बहुतेक प्रदेश मोगलांच्या कायदेशीर आधिपत्याखाली गेला. यातनांचे एक तप शिवाजीवर निष्ठा ठेवणाऱ्या सर्वसामान्य जनतेनेही भोगले आहे. बारा वर्षांच्या जाळपोळ, उद्ध्वस्तपणानंतर आणि यातनांनंतरही ही सगळी माणसे सर्व सामर्थ्याने शिवाजीच्या बाजूने उभी राहिली, असे या मंडळींना शिवाजीने काय दिले होते, हा प्रश्न आपण कधीतरी विचारला पाहिजे.

### सैन्य आणि जनता यांचे संबंध

पुणे जहागिरीच्या भागाला, मावळ भागात बारा वर्षांच्या जाळपोळीनंतरही शिवाजी हाच नेता हवा होता. वर्षानुवर्षे चालू असणारी जाळपोळ आणि अजिंक्य असणाऱ्या प्रचंड फौजा या जनतेच्या मनोगतात बदल करू शकल्या नाहीत. सामान्य जनतेची ही श्रद्धाच सैनिकांच्या तुकड्यांमध्ये रूपांतरित होत असते. हा सैन्य आणि जनता संबंध इतिहासकाळात तर महत्त्वाचा होताच, पण लोकशाहीप्रधान वर्तमानकाळात तो अधिकच महत्त्वाचा ठरला आहे.

### मरण्याच्या प्रेरणेचा उगम

पन्हाळगडाचा वेढा फुटू शकत नाही, हे पाहताच शिवाजीने तिथून पलायनाचा धाडसी बेत आखला. या धाडसी बेताच्या अंमलबजावणीसाठी

काहींना हसतमुखाने, जाणीवपूर्वक बळी जावे लागले असते. शिवा न्हाव्यासारखा एखादा सामान्य माणूस जाणीवपूर्वक मरणाला सामोरा जातो; तेव्हाच शिवाजी पन्हाळगडावरून निसटू शकतो. बाजी प्रभू देशपांडे आणि त्याच्याबरोबर असणारे दोन-तीनशे लोक एखादी खिंड अडवून ठेवण्यासाठी शेवटचा माणूस मरेपर्यंत लढायचे ठरवितात, तेव्हा शिवाजी विशाळगडाला पोचू शकतो. चकवा देऊन पळणे ही मध्ययुगीन राजनीतीतील नित्याची गोष्ट आहे. तुरळक घडणारी गोष्ट असेल तर ती ही आहे की, इतरत्र न दिसणारी बलिदानाची प्रेरणा या ठिकाणी आहे. माणसे लढताना मरतात, ही एक निराळी गोष्ट आहे आणि जाणीवपूर्वक, आपण मरणार याची खात्री असताना, केवळ मरण्यासाठी मरेपर्यंत लढतात, ही एक निराळी गोष्ट आहे. माणसांना मरण्याची प्रेरणा नेमकी कुठून मिळते, याचे उत्तर आपण काय देणार आहोत?

### माणसाच्या जातीचे वैशिष्ट्य

मरणाची प्रेरणा राज्यनिर्मितीतून होत नसते. माणसांना स्वत:च्या बाजूने वळवून घेताना सत्तेत भागीदारी सांगता येते, उपभोगात वाटा देता येतो, पण इतरांना मरणाकडे जाण्याचे आवाहन करताही येत नाही आणि कुणी असे आवाहन केले, तर ते गंभीरपणे कुणी विचारातही घेत नाही. ज्या ठिकाणी आपल्याला असे दिसते की, एखाद्या माणसाच्या सांगण्यासाठी लोक मरण्यास तयार होतात, आपल्या नेत्याने बलिदानाची संधी आपल्याला दिली यामुळे धन्य होतात, त्या ठिकाणी कोणती तरी असामान्य घटना घडत आहे, हे आपण समजून घेतले पाहिजे. एखाद्या जहागीरदाराच्या पोराने राजा होण्यासाठी झटावे, या महत्त्वाकांक्षेचे काही जण कर्तृत्व म्हणून कौतुक करतील. जहागीरदाराचा राजा झाला, तर आपल्यालाही काही मिळेल या आशेने काहीजण त्याच्याही मागे जातील, पण जहागीरदार शहाजीचा मुलगा राजा होतो आहे, ही घटना माणसांना बलिदानाची प्रेरणा देऊ शकत नाही. मरण्याची प्रेरणा ध्येयवादातून येते आणि या ध्येयवादाला चारित्र्यवान नेत्याची जोड असली म्हणजे अशा नेत्याच्या शब्दाखातर माणसे हसत मरू शकतात, हे माणसाच्या जातीचे वैशिष्ट्य आहे.

### बलिदान ही मानवाची सांस्कृतिक प्रेरणा

बलिदान ही एक मानवी जातीची सांस्कृतिक प्रेरणा आहे. आणि या प्रेरणेचा इतिहास सर्व जगभर सुसंस्कृत माणसाच्या जातीइतका जुना आहे. हा नुसता इतिहास नव्हे, तर हा माणसाचा वर्तमानकाळही आहे! शतके बदलतात, काळ

बदलतो, युद्धाची हत्यारे बदलतात, पण कोणत्याही राष्ट्राच्या जनतेत स्वातंत्र्याची प्रबळ आकांक्षा अक्षय असते. विसाव्या शतकातसुद्धा चारित्र्यवान नेत्यांनी हातही न उचलता, जागच्याजागी उभे राहा आणि मरण पत्करा, म्हणून सांगितले आणि लोक शांतपणे मरण पत्करण्यास तयार झाले, हा माझ्या पिढीने डोळ्यांसमोर पाहिलेला वर्तमानकाळ आहे! या देशाच्या स्वातंत्र्य-लढ्यात आपल्या शक्तीनुसार जे सामील झाले होते, त्या सर्वांना बाजी प्रभू देशपांड्यांचे बलिदान ही आपल्याला अत्यंत ओळखीची गोष्ट आहे, असे वाटल्याशिवाय राहणार नाही. ही बलिदानाची प्रेरणा राज्यनिर्मितीतून येत नसते. ती स्वतःच्या चारित्र्याची खात्री जनतेला पटवून देणारा नेता त्या जनतेत स्वातंत्र्याची आकांक्षा प्रज्वलित करून निर्माण करीत असतो, हे सत्य जगाच्या इतिहासात वारंवार सिद्ध झालेले आहे.

### मूल्यांच्या आग्रहातून बलिदानाची प्रेरणा

अलबर्ट कामूने विद्रोहाचे वर्णन करणारा एक विख्यात ग्रंथ लिहिलेला आहे. त्या ग्रंथाच्या आरंभीच या बलिदानाच्या प्रेरणेचा थोडक्यात विचार आहे. आपण जीवनात काही मूल्ये आवश्यक ठरवतो. या मूल्यांना आपण जीवनात इतके महत्त्व देतो की, मूल्यांच्या रक्षणाखातर जीवनाला नकार देणे आपल्याला अगदी स्वाभाविक वाटू लागते. बलिदानाची प्रेरणा मूल्यांच्या आग्रहातून येते. स्वातंत्र्य हे एक असे मूल्य आहे, ज्याने जगभर बलिदानाची सर्वांत मोठी प्रेरणा निर्माण केली आहे. हे स्वातंत्र्य हवे तर ते इतर कुणाचे तरी, असे नसते. ज्याला मी, माझा समाज असे म्हणतो त्याचे आणि त्याच्याबरोबर माझे, असे ते स्वातंत्र्य असते. बलिदानाची प्रेरणा एक प्रकारे चित्तविकासातून येते. समाजाच्या कल्याणात स्वतःचे अस्तित्व विलीन करण्याच्या इच्छेतून ती येते. ज्या वेळी एखादा नेता बलिदानाचा आदेश देतो आणि लोक आनंदाने या आदेशाचा स्वीकार करतात, त्या वेळी हा नेता व्यक्ती राहिलेला नसतो, तो लोकसूमहाच्या स्वातंत्र्याकांक्षेचा मूर्त प्रतिनिधी झालेला असतो. त्याच्या तोंडून राष्ट्र बोलत असते. शिवाजीचे मोठेपण पन्हाळगडाहून पळण्यात आहेच, विशाळगडाचा वेढा तडफेने मोडून काढण्यातही आहे, शाहिस्तेखानाची शास्त्त करण्यात आहे, पण हा लौकिक पराक्रमाचा भाग झाला. या लौकिक पराक्रमापेक्षा अलौकिक पराक्रम बलिदानाची प्रेरणा देण्यात दिसतो!

## स्वातंत्र्याकांक्षा दडपण्यास सेना समर्थ ठरत नाही

पावनखिंड लढवताना मृत्यू पत्करणारा बाजी प्रभू देशपांडे ठळकपणे दिसतो. त्याच्याबरोबर आत्माहुती देणारे तीन-चारशे लोक ठळकपणे दिसले नाहीत तरी दिसतात. न दिसणारी गोष्ट असते, या तीनशे माणसांच्या मागे उभे असणारे त्यांचे कित्येक लक्ष नातेवाईक, सोयरेधायरे, भावकी, गाववाले व संबंधित सैन्य! हे आकाशातून येत नसते. सैन्य जनतेतून उगवत असते. खांद्यावर बंदूक असणारा शिपाई रणमैदानावर उभा असतो. त्याचे बाप, भाऊ, पत्नी, मुले गावात म्हणजे समाजात असतात. हा समाज ज्याच्या श्रद्धेने भारला जातो, त्याच्या श्रद्धेनेच सैन्यही भारलेले असते. हा समाज ज्याच्याविषयी कमालीचा संतप्त असतो त्याच्याविरुद्ध सैन्यही मधूनमधून बंड करत असते. हा समाज जेव्हा उदासीन असतो तेव्हा सैन्य भाडोत्र्याप्रमाणे लढत असते. हा सेना आणि जनतेचा अतूट संबंध समजून घेतल्याशिवाय आपल्याला कोणत्याच देशातील कोणताही स्वातंत्र्यलढा समजणे शक्य होणार नाही. शिवाजीच्या राज्यातील जनता जाळपोळ, विध्वंस, अत्याचार सहन करीत, पण निष्ठेने शिवाजीच्या बाजूने उभी असते. या समाजातील निष्ठेचा उगम ज्या मूळ कंदातून होतो त्या कंदातूनच पावनखिंड लढवणाऱ्या बलिदानाची प्रेरणा मिळत असते. बाजी प्रभू देशपांडे पावनखिंड लढवताना मरून कृतार्थ होतो, या घटनेचा अर्थ शिवाजीची प्रजा, 'हे माझे राज्य आहे' असे समजत होती; शिवाजीकडे आपला मुक्तिदाता म्हणून पाहत होती, या घटनेची द्योतक आहे. स्वातंत्र्याची आकांक्षा ही एकदा पेटली म्हणजे ती विझवण्यास सेनेचे बळ कधी समर्थ ठरत नाही.

## अपराजित मन पराजित राजकारणाला नवी जिद्द देते

शिवाजीने पन्हाळगडाहून सुटका करून घेऊन विशाळगड गाठला. विशाळगडाचा वेढा मोडून काढला. पन्हाळगड विजापूरकरांना देऊन त्यांच्याशी तात्पुरता तह केला. उंबरखिंडीत कहारतलबखानाच्या मोगल फौजांचा पराभव केला. एक दिवस लाल महालात घुसून शाहिस्तेखानाला आश्चर्यचकित केले! धास्तावलेले मोगल सैन्य परत फिरताच धाडसी हल्ला करून सुरत लुटली आणि पन्हाळगडच्या स्वारीत इंग्रजांनी आदिलशाहीला साथ दिली म्हणून त्यांनाही धडा मिळेल असे शासन केले. या सर्वांचा शेवट मिर्झा राजे जयसिंग यांच्या स्वारीत होतो. मिर्झा राजे जयसिंग यांची स्वारी म्हणजे जवळजवळ आलमगीर औरंगजेबाचीच स्वारी आहे! सुमारे ऐंशी हजारांच्या फौजा घेऊन मिर्झा राजे जयसिंग शिवाजीच्या राज्यात १६६५ च्या मार्चमध्ये हजर झाले आणि पुढच्या

तीन महिन्यांत त्यांनी शिवाजीला संपूर्णपणे खिळखिळे करून शरण आणले. मिर्झा राजे जयसिंग यांच्याबरोबर १६६५ साली शिवाजीने केलेला तह हा लष्करीदृष्ट्या आपला पूर्ण पराजय झालेला आहे याची कबुली होती. या तहामागील मुत्सद्देगिरी आणि चातुर्य हुडकून काढण्याचा प्रयत्न करणे म्हणजे खोटे भ्रम नव्याने निर्माण करण्याचा उद्योग करणे होय! असे उद्योग करण्याची आवश्यकताच नाही. जो लष्करी पराभव आहे, तो सरळ पराभव म्हणून मान्य करण्याची सचोटी आणि धैर्य आपल्याजवळ असले पाहिजे. मोगलांची सैनिकी शक्ती शिवाजीच्या सैनिकी शक्तीला भारी ठरली, हा या घटनेचा सरळ अर्थ आहे. या पराभवातून शिवाजी उठून उभा राहतो तो प्रबळ स्वातंत्र्याकांक्षेच्या जोरावर. ते सामर्थ्य तलवारीतून उगवणारे नाही, ते मनातून उगवणारे सामर्थ्य आहे. अपराजित मन पराजित राजकारणाला नवी जिद्द देते, हे म्हणणे निराळे आणि पराजयच झाला नव्हता, असा भ्रम मनात घट्ट करणे निराळे!

### विरोधक जबरदस्त होते

इ.स. १६५९ पासून एका लखलखीत कालखंडाला आरंभ होतो. या कालखंडात आकाशात सारख्या विजा चमकत आहेत, त्यामुळे सर्वांचेच डोळे दिपून जातात! या कालखंडाचा शेवट उजेडात होत नाही, त्याचा शेवट अंधारात होतो! अनेक जय, अनेक लढाया, अनेक धाडसे, सहकाऱ्यांचे अद्भुत पराक्रम या साऱ्यांचा शेवट एका दारूण पराभवात होतो. हा या अध्यायाचा अर्धविराम आहे. ज्या शक्तींच्या विरोधात शिवाजी लढत होता, त्या शक्ती सामान्य नव्हत्या. युद्ध-तज्ज्ञता आणि लढाईचे नियोजन इतकाच विचार आपण केला तर, अफझलखान, सिद्दी जोहर, मिर्झा राजे जयसिंग, आलमगीर औरंगजेब ही सामान्य माणसे नव्हेत. जर ही सामान्य माणसे असती, तर त्यांच्यावर जय मिळवणे हेही सामान्य कर्तृत्व ठरले असते. असामान्य कर्तृत्वाचे रहस्यच यात असते की, ते असामान्य प्रतिकूल परिस्थितीच्या विरोधात उभे असते. शिवाजी हा युगप्रवर्तक नायक आहे. त्याच्या युगप्रवर्तक कर्तृत्वाला तेवढ्याच मोठ्या प्रतिकूल सामर्थ्यामुळे अर्थ येतो. म्हणूनच पुरंदरच्या तहामुळे एक गोष्ट सिद्ध होते. ज्या शक्तीच्या विरुद्ध शिवाजी लढत होता तिचे बळ किती मोठे होते! या सैनिकी बळाच्या विरुद्ध सेनाबल पुरेच पडले नसते. जेत्यांच्या सैनिकी सामर्थ्यावर मात जितांचे सैनिकी सामर्थ्य करीत नाही. जितांचा विजय प्रबळ स्वातंत्र्याकांक्षेतून साकार होत असतो.

पुरंदरच्या तहामुळे शिवाजीला प्रदेश गमवावा लागला, बलाढ्य किल्ले गमवावे लागले, मानहानी पत्करावी लागली. आग्र्याला औरंगजेबाच्या भेटीसाठी जावे लागले, तिथे अटकेत पडावे लागले. शिवाजीचे आग्र्याहून पलायन ही अजून एक रोमहर्षक घटना आहे. नाटकांचा विषय झालेल्या या रोमांचक घटनेच्या शेजारी नाटकांचा विषय न झालेली दुसरी तेवढीच रोमांचक घटना आहे; ती जास्त महत्त्वाची आहे. ही रोमांचक घटना म्हणजे दारूण पराभवानंतर राहिलेली सहकाऱ्यांची वागणूक. वर्षानुवर्षे दंगली आणि उद्ध्वस्तता भोगणाऱ्या या मुलखाला पुरंदरच्या तहामुळे शांतता मिळाली, ही गोष्ट खरी असली तरी तो तह शांततेसाठी करण्यात आलेला नव्हता. एवढ्या मोठ्या नामुष्कीच्या अटी मान्य करून शांतता मिळवावी, ही महाराजांची प्रवृत्ती नव्हती. शांतता हा पुरंदरच्या तहाचा आनुषंगिक परिणाम होता. महाराजांनी लढायचेच ठरवले असते आणि आणीबाणीची लढाई दिली असती, तर त्याचा परिणाम काय झाला असता, हे निश्चित कुणीच सांगू शकणार नाही. विजापूरच्या विरुद्ध मिर्झा राजे जयसिंग अयशस्वीच ठरले, ते शिवाजीच्या विरुद्ध यशस्वी ठरलेच असते असे सांगता येणार नाही. पण या घनघोर लढाईत परिश्रमाने उभ्या केलेल्या हजारोंच्या फौजा बरबाद झाल्या असत्या, ही गोष्ट खरी आहे. इतरही काही कारणे त्यांच्या डोळ्यांसमोर असतील, जी आज विस्मृत झालेली आहेत. या साऱ्यांचा परिणाम म्हणून महाराजांनी तह करण्याचा निर्णय घेतला. कुशल सेनापतीला लढण्याची शक्ती शाबूत ठेवून वेळेवर तह करण्याचे धैर्य दाखवावे लागते. कारण या तहात पराभव उघड होता. इस. १६४९ साली आदिलशाहीशी तह करताना पराभव तितका उघड नव्हता, पण त्या मानाने या वेळी पराभव आपले नागडे सत्य घेऊन हजर होता. या दारूण पराभवाचा परिणाम नेताजी पालकरांच्यासारख्या शिवाजीच्या सेनापतीवरही झाला. त्याचे मन चलबिचल झाले आणि त्याने शिवाजीची साथसंगत सोडली. पुढच्या काळातील शिवाजीचे मंत्रिमंडळ आपण पाहिले, तर ते प्रामुख्याने तीन कसोट्यांतून बाहेर पडलेले दिसून येते. इ.स. १६६० ते ६६ या कालखंडात जे धैर्याने लढले, ज्यांनी निर्दोषपणे राज्यकारभार केला, राजाच्या गैरहजेरीत ज्यांनी कारभार कुठेही शिथिल होऊ दिला नाही व ज्यांच्या निष्ठा अभंग राहिल्या ती माणसे या मंत्रिमंडळात आहेत. ही पहिली कसोटी होती. पुरंदरच्या तहाचा दारूण पराभव ज्यांना विचलित करू शकला नाही, ज्यांनी शिवाजी औरंगजेबाच्या विळख्यात

सापडलेला असतानाही पुन्हा कारभार चोख ठेवला, आणि निष्ठा अभंग ठेवल्या, ती माणसे या मंत्रिमंडळात आहेत. या दुसऱ्या कसोटीत नेताजी पालकर गळून गेला! ज्यांनी लष्करी पराक्रम आणि नागरी शासन असे सव्यसाचित्व दाखवले व सर्व तयारीने सज्ज राहून पुढच्या उठावाची इशारत झाल्याबरोबर दोन महिन्यांत पुरंदरच्या तहाने गमावलेला प्रदेश जिद्दीने परत मिळवून दाखवला ते या मंत्रिमंडळात आहेत. याला अपवाद प्रतापराव गुजरांच्या अपघाती मृत्यूचा आहे.

### दोन सनांमधील फरक

इ.स. १६४९ आणि इ.स. १६६६ या वर्षांच्यामध्ये काही साम्य आहे. एका बलाढ्य शक्तीच्या विरुद्ध तात्पुरती पड खाणे, इथून पुढच्या प्रदीर्घ उठावाच्या योजना आखणे, पराभवात जनतेच्या निष्ठा आणि सैन्याची उभारी शाबूत ठेवणे आणि पुढचा उठाव नेत्रदीपक होईल याची काळजी घेणे, या दृष्टीने या दोन इसवी सनांचे सामर्थ्य आहे, पण या दोन सनांमध्ये फार मोठा फरकही आहे. इ. स. १६४९ मध्ये शिवाजी ही एक स्थानिक घटना होती. तिचे सैनिकी सामर्थ्य तीन-चार हजारांहून जास्त नव्हते. १६६६ मध्ये शिवाजी ही अखिल भारतीय महत्त्वाची विभूती होती. तिचे सैनिकी सामर्थ्य निश्चितच साठ-सत्तर हजारांहून जास्त होते. तिच्यामागे तेजोवलय होते. हा वाढता मोठेपणा वाढत्या श्रद्धांना कारणीभूत होतो. त्याप्रमाणेच घोर भ्रमनिरासालाही कारणीभूत होतो. म्हणूनच असे म्हटले आहे की, आधीची ४-५ वर्षे जाळपोळीत गेली, नंतर प्रचंड पराभव झाला व शेवटी राजा अटकेत पडला. तो कधी परत येणार याची खात्री नाही. अशाही वेळी राज्ययंत्र शिस्तीत चालते, फौजा निष्ठेने उभ्या असतात, प्रजा बंड करत नाही. ही घटना जास्त रोमांचकारी आहे! शिवाजीने निर्माण केलेला प्रचंड विश्वास आणि जनतेच्या श्रद्धा जर पाठीशी नसत्या, तर युद्धकौशल्य येथे व्यर्थ आहे. शिवाजीच्या युद्धनेतृत्वाला नेहमीच ही जनतेची व्यापक पार्श्वभूमी राहिली, हे विसरून जाऊन त्या नेतृत्वाचा विचार करता येणार नाही.

### नियोजनपूर्वक साहस ही शिवरायांची प्रकृती

औरंगजेबाच्या कैदेतून शिवाजी महाराज निसटले कसे, हे गूढच आहे. शिवाजी कधी मन मोकळे करून आपण कसे निसटलो हे सांगणार नाही. त्याचे निकटवर्तीय कधी या प्रश्नावर तोंड उघडून बोलणार नाहीत, आणि जे या मुद्द्यावर बोलतील त्यांच्याजवळ फारशी माहिती असणार नाही. समकालीन

आख्यायिका मिठाईच्या पेटाऱ्यातून पलायन झाल्याची आहे. तिचा उल्लेख सभासदानेही केला आहे. इंग्रजांच्या वृत्तान्तातही आहे. शक्य आहे, ते मिठाईच्या पेटाऱ्यातून पळाले असतील. हेही शक्य आहे की, त्यांनी खऱ्या मार्गाचा पत्ता लागू नये म्हणून ही भूमिका प्रसिद्ध केली असेल! अफझलखानाचा वध, पन्हाळगडातून पलायन, शाहिस्तेखानाची शास्त, आग्ऱ्याहून सुटका- या सगळ्या धाडसी कहाण्या आहेत. त्यांची गीते गाण्याचा कवींना आणि ऐकण्याचा रसिकांना कधी कंटाळा येत नाही. या सर्व घटनांमुळे मुद्दा सिद्ध होतो तो एवढाच की, शिवाजीचा स्वभाव धाडसी होता. चौदा-पंधरा वर्षांच्या पोराने जवळ काही नसताना सर्व भारतातील बलाढ्य पादशाह्यांशी टक्कर घेण्याचा मनसुबा बोलून दाखवावा आणि एका अननुभवी मुलाने देशात नवे युग आरंभ करण्याचे स्वप्न रचावे, हीच एक धाडसी गोष्ट होती. या मोठ्या धाडसाच्या मानाने उरलेली सर्व धाडसे गौण मानावी लागतील, पण नियोजनपूर्वक साहस ही शिवाजीची नित्य प्रकृतीच होती! त्याच्याजवळ सैनिकाचे शौर्य आणि सेनापतीचे शौर्य या दोहोंचाही संगम झालेला होता व याहीखेरीज अनेक प्रवृत्ती होत्या. एखाद्या समुद्राचे वर्णन करताना त्यात नद्यासुद्धा मिळालेल्या आहेत, हे सांगणे जितके हास्यापद होईल तितकेच हास्यास्पद शिवाजी धाडसीसुद्धा होता हे सांगणे होईल! धाडस तिथे आहेच, फक्त कोणते धाडस महत्त्वाचे समजायचे हे ज्याच्या-त्याच्या दर्शन घेण्याच्या पद्धतीचा भाग आहे.

### आरमाराकडे लक्ष

आग्ऱ्याहून सुटून शिवाजी महाराज इ.स. १६६६ च्या सप्टेंबर महिन्यात पुन्हा महाराष्ट्रात परत आले. परत आल्यानंतर त्यांनी औरंगजेबाशी तह केला. आपण उठाव करणार नाही, याची खात्री दिली. औरंगजेबालाही या वेळी नवे युद्ध नको होते. त्यामुळे जर शिवाजी शांतपणे बसत असेल तर औरंगजेब, 'परवानगी न घेता पळून जाणे', या गुन्ह्याकडे दुर्लक्ष करण्यास तयार होता. यानंतर शिवाजी महाराजांनी धीमेपणाने पुन्हा नव्या उठावाची तयारी करण्यास आरंभ केला. आपल्या शक्तीची चुणूक दाखवून त्यांनी आदिलशाही व कुतुबशाही यांच्याशी तह केला. त्यांच्याकडून एक नियत खंडणी मिळावी अशी व्यवस्था केली. पुन्हा एक कालखंड व्यवस्थापनाचा, प्रजारक्षणाचा, नव्या उठावाची तयारी करण्याचा येतो. या कालखंडात शिवाजीने आपल्या आरमाराकडे जास्त लक्ष दिले. शांततेचा काळ संपून १६६९ अखेर उठावाचा काळ सुरू होतो.

### नवा यशस्वी उठाव

इ.स.१६५६ साली जावळीचे खोरे घेऊन महाराजांनी आदिलशाहीला इशारत दिली आणि मिळालेला काळ अफझलखानाच्या स्वारीला उत्तर देण्याची तयारी करण्यात काढला. या तयारीच्या जोरावर अफझलखान, सिद्दी जोहर, शाहिस्तेखान या साऱ्यांना उत्तरे मिळाली, पण मिर्झा राजांनी हे चक्र पुन्हा फिरवून विफल करून दाखवले! आता नव्या उठावाच्या वेळी आदिलशाही व कुतुबशाही ही आव्हाने उरलेली नव्हती. आदिलशाही व कुतुबशाहीला मोगल साम्राज्याचा धोका होताच. त्यामुळे दक्षिणवासीयांच्यासाठी दक्षिण, या सूत्रात मराठ्यांचे राज्य, कुतुबशाही व आदिलशाही यांचे सख्य घडले. कुतुबशाही आणि आदिलशाही या राजवटी आपल्या प्रजेच्या प्रतिनिधी नव्हत्या, पण त्या स्वतःला देशी समजणाऱ्या राजवटी होत्या, यामुळे या नव्या उठावाच्या वेळी मुख्य स्पर्धक शक्ती एकमेकांच्या विरोधात उभ्या आहेत. यानंतरचा नवा उठाव म्हणजे आलमगीर औरंगजेबाच्या स्वारीला निमंत्रण, हे गृहीत धरूनच या नव्या उठावाकडे पाहायला पाहिजे. नेहमीप्रमाणे शिवाजीचा हाही उठाव संपूर्ण नियोजनबद्ध व प्रतिस्पर्ध्यांना आश्चर्यचकित करणारा असाच होता. इ.स. १६७० सालचा पावसाळा लागण्यापूर्वीच महाराजांनी पुरंदरच्या तहात जे गमावले ते सारे मिळवून अधिक काही प्रदेश आपल्या ताब्यात आणला होता.

### आलमगिराच्या मुकाबल्याची तयारी

इ.स. १६६९ अखेर उठावाचा बेत ठरला. १६७० च्या आरंभापासून उठाव सुरू होतो. या उठावात फौजांचा एक भाग दूरवर मोगली मुलखात लूट करण्यासाठी जातो. या लुटीत वऱ्हाड आहे, औसा, औरंगाबाद, नगर, जुन्नरचा समावेश आहे. फौजांचा एक भाग गेलेले किल्ले वेगाने परत घेत असतो. यात तानाजी मालुसरे यांचे दिव्य बलिदान आहे व त्याबरोबरच निळोपंत आणि अण्णाजी दत्तो यांचाही नेत्रदीपक पराक्रम आहे. याच वेळेला फौजांचा तिसरा भाग कोकणात उतरून मोगलांचे तेथील प्रभुत्व संपवून टाकतो. याच वर्षी ऑक्टोबर महिन्यात राजांनी सुरतेवर दुसरी झडप घातली आहे. १६७० पासून महाराजांचा जो नवा उठाव सुरू झाला त्याचा प्रतिकार करण्यासाठी मोगल सेना झटतच होत्या. पण अशा तुटक व सुट्या प्रयत्नांनी शिवाजीच्या पराक्रमाला गवसणी घालणे शक्य नाही, हे आलमगीरही समजून होता याची महाराजांनाही जाणीव होती. अधूनमधून आदिलशाहीचे त्यांचे बिनसत असे, पण त्याचा कोणताही गैरफायदा मोगलांना घेता आला नाही. आता यानंतरचा खरा

महत्त्वाचा प्रश्न आलमगीर औरंगजेबाची स्वारी हा होता. त्या दिशेने सर्व तयारी सुरू झालेली होती.

### जीवन – मरणाचा लढा

मिर्झा राजे जयसिंग यांना पाठवतानाच औरंगजेबाने असे म्हटले आहे की, प्रत्यक्ष पादशहांनी जावे अशी वेळ आलेली आहे, पण त्याऐवजी तुम्हाला पाठवतो. आता मिर्झा राजे अस्तित्वात नव्हते. पूर्वीपेक्षा शिवाजीचे सामर्थ्य वाढलेलेही होते. शांततेची काही वर्षे त्या मुलखाला मिळालेली होती. दीर्घकालीन युद्धाची पूर्वतयारी करण्यास अवधी होता. आता तर शिवाजीवर पादशहांनी स्वत: चालून जाणे याखेरीज दुसरे कोणते उत्तरच संभवत नव्हते. १६७० ला सुरतेची दुसरी लूट झाल्यानंतर औरंगजेबाची स्वारी ही एक निश्चित बाब होती, म्हणून प्रश्न फक्त औरंगजेब सर्व निरवानिरव करून प्रदीर्घ लढ्यासाठी दक्षिणेत केव्हा उतरतो हाच होता. आमगीरला याची जाणीव होती की, आता दक्षिणेत प्रदीर्घ, जन्ममरणाचा झगडा सुरू होत आहे. हा झगडा प्रदीर्घ असल्यामुळे उत्तरेची व्यवस्था झाल्याशिवाय तो निघू शकत नव्हता. महाराजांनाही या पुढच्या लढ्याची कल्पना होतीच. त्याच दिशेने त्यांची पावले पडत होती.

### राज्याभिषेकाची गरज

शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाकडे या दृष्टीने पाहिले पाहिजे. हा खरे म्हणजे नव्याने राजे होण्याचा प्रकार नव्हताच. हिंदुस्थानात जागोजाग छोटे-मोठे राजे होते. त्यांच्यातील कुणाला अभिषेकाची गरज पडली नव्हती. रजपूत राजांनाही अशा अभिषेकाची गरज कधी भासलेली नाही. शिवाजीला स्वत:च्या प्रजेवर राज्य करण्यासाठी अभिषेकाची गरज नव्हतीच. आपला नेता, राजा, मुक्तिदाता, आपला पुण्यपुरुष म्हणून त्याच्या प्रजेने त्याला नेहमीच माथ्यावर धारण केलेले होते. मग राज्याभिषेकाची गरज काय होती?

ही गरज तत्कालीन परिस्थितीत शोधायला पाहिजे. शिवाजी हा जनतेच्या स्वातंत्र्याकांक्षेचा प्रतिनिधी होता. ही स्वातंत्र्याकांक्षा त्याच्या ताब्यातील प्रदेशातच प्रज्वलित होईल हे संभवत नव्हते. सर्व हिंदुस्थानभर जागोजागी जनता होती. तिच्या अंत:करणात शिवाजीने दिलेल्या हाकेचे प्रतिध्वनी उमटत होतेच. जागोजागी या जनतेला सुयोग्य नेतृत्व मिळाले नसेल, त्यांचे उठाव फारसे यशस्वी झाले नसतील, परंतु ती खळबळ समाजात चालू होती. अशा खळबळी

चालू असल्या म्हणजेच जेते दडपणाचे नित्यापेक्षा अधिक अधिकार गाजवू इच्छितात व आपले श्रेष्ठत्व सिद्ध करतात. १६६७-६८ नंतर औरंगजेब झपाट्याने या पद्धतीने पावले उचलीत होता. शिवाजीचा राज्याभिषेक हे सर्व भारतभर पसरलेल्या प्रजेला आपण तुमचे मुक्तिदाते आहो, नेते आहो आणि रक्षणकर्ते आहो असे आश्वासन होते! महाराजांच्या राज्याभिषेकाने शिवाजी हे आव्हान औरंगजेबाच्या थेट राजधानीत येऊन उभे राहिले. साम्राज्याच्या एका सीमेवर शिवाजीच्या रूपाने एक उठाव आतापर्यंत उभा होता. आता साम्राज्यातील सर्व जनतेचे नेतृत्वच शिवाजीने स्वयंभूपणे घोषित केल्यामुळे शिवाजीचा पाडाव ही तातडीची व मोगल सत्तेच्या अस्तित्वाला आवश्यक असणारी अशी घटना झाली होती.

### अनपेक्षित मृत्यू

राज्याभिषेकाच्यानंतरचे महाराजांचे जीवन फार थोडे आहे व या थोड्याशा जीवनात कर्नाटक दिग्विजयासारखा एक पराक्रम आहे. त्यात पराक्रमाबरोबरच दूरदृष्टी आहे. कारण यापुढे आलमगीर औरंगजेबाच्या विरुद्ध जर यशस्वीरित्या लढायचे असेल, तर कुतुबशाही, आदिलशाही आणि मराठ्यांचे राज्य एकत्रितपणे मोगलांच्या विरुद्ध उभे राहिले पाहिजे. गरज पडेल तर मराठ्यांना युद्धमान नसलेली एक भूमी आपत्तीत क्षणकाल उपलब्ध असली पाहिजे आणि जर ऐन वेळी विजापूरकर, कुतुबशहा साहाय्याला कच खाणार असतील, तर त्यांच्या पाठीवर आपल्या फौजा असल्या पाहिजेत. या सगळ्या ध्येयवादाच्या आड येणारे स्वत:च्या भावाचे अस्तित्वही तिथे क्षम्य होण्याचा संभव नव्हता! या कालखंडातील शिवाजीचा सर्वांत मोठा पराभव म्हणजे युवराज संभाजीने मोगलांकडे जाणे हा आहे! मोठ्या मिनतवारीने संभाजीला परत आणावे लागले. एकीकडे हा सगळा प्रकार चालू होता. राज्यविस्तार आणि नव्या दूरगामी युद्धाची तयारी चालू होती. दुसरीकडे क्रमाने मोगल फौजा मराठ्यांच्या सरहद्दीच्या भोवती येऊन उभ्या राहात होत्या. प्रत्यक्ष बादशहा आता स्वारीवर येणार, असे सर्वजण बोलत होते. या वातावरणात शिवाजी महाराजांचा मृत्यू झालेला आहे!

### नेतृत्वाचे खरे यश

जे इ.स. १६४५ साली पुरस्कारले गेले ते म्हणजे मराठ्यांचे राज्य नव्हे. जे पुरंदरच्या तहातून शिल्लक राहिले तेही मराठी राज्य नव्हे. राज्याभिषेकाच्या शेवटी जे दिसत होते किंवा शिवाजीच्या मृत्यूच्या दिवशी जे अस्तित्वात होते

तेही मराठी राज्य नव्हे. शिवाजीच्या मृत्यूनंतर सत्तावीस वर्षांच्या प्राणघेऊ प्रदीर्घ झुंजीतून जे शिल्लक राहिले, ते मराठ्यांचे खरे राज्य आहे. शिवाजीने पेटवलेली ज्योत कर्ते राजे आणि सेनापती नसताना प्रचंड फौजांच्या विरुद्ध सत्तावीस वर्षे अखंड झगड्याला पुरू शकली, यात त्याच्या नेतृत्वाचे खरे यश आहे. शिवाजीने ज्या सामर्थ्याने सर्व विरोधी फौजांशी टक्कर दिली, जे नेत्रदीपक विजय मिळवले ते महत्त्वाचे आहेतच, पण त्याच्या युद्धनेतृत्वाचा सर्वांत वैभवशाली विजय आपल्या अनुपस्थितीत सत्तावीस वर्षे पुरेल एवढा प्रकाश उपलब्ध करून देण्यात आहे. शिवाजीचे युद्धनेतृत्व आणि त्याने प्रज्वलित केलेली स्वातंत्र्याकांक्षा या दोन सुट्या बाबी नसून त्या एकाच नाण्याच्या दोन वेगवेगळ्या बाजू आहेत.

### युद्धनेतृत्वाचे स्वरूप

हा शिवाजीचा समग्र इतिहास नव्हे. समग्र इतिहास समजावून सांगणे इतक्या थोड्या पृष्ठसंख्येत शक्यही नाही, तशी अपेक्षाही नाही. या कर्तृत्वाकडे पाहात असताना शिवाजीच्या राजकारणाचे आणि आकांक्षांचे जे परस्परावलंबी पदर आहेत, त्यांच्याकडे लक्ष वेधणे हा माझा प्रमुख हेतू होता. युद्धनेतृत्व म्हणजे केवळ लढणे नव्हे. लढणे, पळून जाणे, तह करणे, पुन्हा उठाव करणे- हे सगळे मिळून युद्धनेतृत्व असते. म्हणून तपशीलवार भौगोलिक माहिती मिळवणे, मिळालेली उसंत चढाईच्या तपशीलवार योजना करण्यासाठी वापरणे, शांततेचा काळ फौजा उभारण्यात आणि साधनसामग्री गोळा करण्यात खर्चणे हेही युद्धनेतृत्व आहे. आपल्या सहवासात सामान्य माणसे घेऊन त्यांच्यात दडलेले सुप्त सामर्थ्य विकसित करणे, त्यांच्यातून असामान्य युद्धनेते, असामान्य प्रशासक निर्माण करणे आणि आपल्या ध्येयवादाने भारलेली शेकडो कर्तृत्ववान आणि निष्ठावान कार्यकर्त्यांची फळी उभी करणे हेही युद्धनेतृत्व आहे, पण त्याबरोबरच जिच्या मुक्तीसाठी हा लढा चालू आहे, त्या जनतेला हा लढा आपल्या मुक्ततेचा आहे, याची खात्री पटवून देणे, ती खात्री अभंग ठेवणे आणि जनतेची स्वातंत्र्याकांक्षा प्रज्वलित करून हे आपले राज्य निर्माण होते आहे अशी नव्या राष्ट्रवादाची जाणीव निर्माण करणे, हेही युद्धनेतृत्व आहे. शिवाजीसारखा युगप्रवर्तक नेता ज्या युद्धाचा नेता असतो ते युद्ध जनतेचे स्वातंत्र्ययुद्ध असते. जनतेच्या स्वातंत्र्ययुद्धाला चौरसपणा, व्यापकपणा आणि शत-परिमाणांचा आधार असतो. हे सगळे वैविध्य स्वातंत्र्याकांक्षेच्या एका सूत्रात गुंफलेले असते. राष्ट्रनेत्यांचे नेतृत्व हा एक सलग एकांक असतो. तो एक सलग घटनाक्रम असतो. पण एकांक म्हणजे ठराविक रंग-आकाराचा एक ठोकळा नव्हे. ते

प्रतिक्षणी नवी छटा दाखवणारे सहस्र पाकळ्यांचे एक उत्फुल्ल कमल असते. आपण प्रत्येक पाकळी वेगळी समजून दाखवण्यात काय अर्थ आहे?

जीवनाचा स्वभाव संश्लेषणाचा आहे. विवेचक पद्धतीने विचार करणाऱ्यांचा कल विश्लेषणाकडे असतो; त्यांना एकेक गोष्ट मोजून दाखवल्याशिवाय बरी वाटत नाही. ही प्रत्येक गोष्ट मोजून दाखवण्याला एक महत्त्व असते. कारण पुष्कळदा असे घडते की, जर मुद्दाम उकलून दाखवले नाही, तर एखाद्या महत्त्वाच्या बाबीकडे दुर्लक्षच होते. म्हणून काही गोष्टी मुद्दाम सांगाव्या लागतात. ज्या बाबी मुद्दाम वेगळ्या सांगितल्या तरी खरे म्हणजे मूळ सूत्राचाच त्या अविभाज्य भाग असतात, अशा बाबी सांगाव्यात की, सांगू नयेत याविषयी मी संभ्रमात आहे. कारण त्या सांगितल्या तर स्वाभाविकच असणारा एक तपशील मुद्दाम सांगितला असे कोणाला वाटेल. त्या न सांगितल्या तर विसरल्या जातील की काय, अशी भीती माझ्यासारख्याला वाटते. अशी मुद्दाम सांगण्याजोगी पहिली महत्त्वाची गोष्ट शिवाजी महाराजांचे आरमार ही आहे.

## आरमार हे महाराजांचे वैशिष्ट्य

आरमाराकडे महाराजांनी लक्ष देण्यास नक्की केव्हापासून आरंभ केला, हे सांगता येणार नाही, पण इ.स. १६६० च्या नंतर निश्चितपणे त्यांचे आरमार समुद्रपट्टीतून आपली गस्त घालीत असताना दिसते. हिंदुस्थानसारखा देश हा हजारो मैलांची समुद्रपट्टी असणारा देश आहे. इतिहासात कोणे एके काळी हा देश आपल्या दर्यावर्दीपणाबद्दल प्रसिद्ध होता; पण इ.स. १००० नंतर भारतीयांचे समुद्राकडचे लक्ष संपूनच गेलेले होते. सर्व जगभर नौकानयन करणारे भारतीय नाविक आपली ही विद्या विसरले होते. सर्व जगभर आपला दर्यावर्दीपणा गाजवणारे मुसलमान भारतात राज्यकर्ते झाले, तेही समुद्राचे महत्त्व विसरून गेले होते. समुद्राचे महत्त्व विसरलेल्या या काळात सतराव्या शतकात समुद्राला नवे महत्त्व आले होते. जगाचा इतिहास क्रमाने खलाशी राष्ट्रांच्या इतिहासात रूपांतरित होत होता. भारतभूमीच्या नकाशावर ठिपके ठिपके म्हणून पोर्तुगीज, डच, इंग्रज व फ्रेंच येऊन उतरले होते. त्यांचे नौदल भारताभोवतालच्या समुद्रात फिरत होते. एका नव्या दिशेने अनपेक्षितपणे येऊ घातलेल्या प्रचंड पारतंत्र्याची ही चाहूल होती. आधुनिक भारताशी अनुबंध असणारा, समुद्राचा गंभीरपणे विचार करणारा पहिला भारतीय राजा शिवाजी आहे! त्याने उभारलेल्या आरमाराला नव्या खलाशांच्या इतिहासात केवळ भारताच्या दृष्टीने नव्हे, तर सर्व दक्षिण आशियाच्या दृष्टीने एका नव्या जागृतीचे चिन्ह म्हणून विचारात घ्यावे

लागेल. दुर्दैवाने आपली ही जाणीव शिवाजी आपल्या अनुयायांमध्ये संक्रान्त करू शकला नाही. भूमीवर नजर खिळलेल्या लोकांचा खलाशी जगात अपरिहार्यपणे होणारा पराभव हे राष्ट्र टाळू शकले नाही!

### बांधणीवर भर

आपल्या राज्याच्या गरजेनुसार बांधकाम हा महाराजांचा नित्य उद्योग होता. त्यांनी माणसे बांधली. फौजा बांधल्या. राज्य बांधले. हे नव्याने निर्माण होणारे राज्य कोणत्या प्रतिकूल शक्तींच्या विरोधात उभे आहे याची त्यांना जाणीव होती. म्हणून प्रचंड किल्ल्यांचे बांधकामही त्यांनी केले. हे सारे राज्य ज्या जनतेसाठी होते, तिच्यासाठी कौल देऊन गावे वसवणे, नव्या बाजारपेठा वसवणे हे तर बांधकाम त्यांनी केलेच, पण मराठी भाषा बांधण्यासाठी त्यांनी 'राज्यव्यवहार कोश' सारखेसुद्धा उपक्रम केले. समाजाच्या भौतिक व मानसिक उन्नतीविषयी सतत चौकस असणाऱ्या राज्यकर्त्याला आरमाराकडे दुर्लक्ष करून भागणारही नव्हते, तसे त्यांचे दुर्लक्ष होणे शक्यही नव्हते. महाराजांचे राज्य जेव्हा निर्माण होऊ लागले त्याच काळात सुरतेच्या बरोबरीने मुंबईलाही ईस्ट इंडिया कंपनीचे ठाणे क्रमाने बळकट होऊ लागले. इंग्रजांनी स्वत:ला कोणत्याही भारतीय सत्तेचे मांडलिक मानले नाही, पण व्यवहारत: त्यांना कधी मोगलांशी तर कधी आदिलशाहाशी मित्र म्हणून वागणे भाग असे. शिवाय त्यांच्याही स्वतंत्र महत्त्वाकांक्षा होत्या. त्यामुळे इंग्रज राजसत्ता राजांच्या विरोधात होती. तिचे नाविकदल विरोधात होते. ही भारतापुरती परिस्थिती होती. इंग्रजांच्याबरोबर भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर स्वत:चे राज्य मांडून बसलेले पोर्तुगीज होते. पोर्तुगीजांचे संबंध मराठ्यांशी सतत मैत्रीचे किंवा सतत विरोधाचे राहिले नव्हते. ते सारखे मैत्री आणि विरोध असे आलटून-पालटून बदलत असत आणि इंग्रज, पोर्तुगीजांखेरीज एक प्रबळ सागरी सत्ता असलेला, आदिलशाहीशी फटकून वागणारा, पण गरजेनुसार आदिलशाहीशी सख्य ठेवणारा एक जंजिरा-मुरुडकर सिद्दीही होता. या साऱ्यांच्यामुळे मराठ्यांच्या राज्याची सगळी किनारपट्टी सदैव धोक्यात असे.

### आरमाराचा नेत्रदीपक पराक्रम

या धोक्याकडे आदिलशाहीने अगर मोगलांनी फारसे लक्ष कधीच दिले नाही. भारतातून हजारो यात्रेकरू त्याही काळात हाजला जात असत. त्यांच्या संरक्षणाची जबाबदारी पोर्तुगीजांच्यावर टाकून भारतीय राजसत्ता निश्चिंत

झालेल्या होत्या! अशा या काळात आरमार हे राज्याचे एक स्वतंत्र अंग आहे, या जाणिवेने स्वत:चे नाविकदल महाराजांनी उभारले. हे नाविकदल उभारताना सिंधुदुर्गासारखा जलदुर्ग उभारावा लागला. खांदेरीच्या तटबंदीसारखी एक तटबंदी इंग्रजांशी लढत देत बांधून काढावी लागली. स्वत:च्या लढाऊ आणि व्यापारी नावा तयार कराव्या लागल्या. इ.स. १६६० पासून हा आरमार उभारण्याचा उद्योग चालू आहे. युरोपमध्ये नौकानयन विद्या सर्व जगाचा समुद्र ताब्यात घेण्याइतकी साहसी बनली होती. या खलाशांनी युरोपला नवी भूमी, नवे साम्राज्य मिळवून दिले. युरोपमध्ये तोफा आणि दारूगोळा हे युद्धसाहित्याचे उत्पादनही विकसित झाले होते. युरोपच्या सागरी युद्धक्षमतेच्या मानाने मराठ्यांनी २५-३० वर्षांत उभारलेले आरमार हे निश्चितच किरकोळ, पण या किरकोळ आरमाराने गाजवलेला पराक्रम मात्र डोळ्यांत भरण्याजोगा होता. सिद्दी, पोर्तुगीज आणि इंग्रज यांचा संपूर्ण पाडाव करणे मराठ्यांच्या आरमाराला कधी जमले नाही, पण त्यांनी यशस्वीरित्या तिघांचीही नाकेबंदी केली. भारतीय समुद्रात पाश्चिमात्त्यांची चालू असणारी अनिर्बंध सत्ता मराठ्यांच्या आरमाराने निकालात काढली. मराठी आरमार समुद्रात फिरत आहे, आपणांसही जाब विचारणारे कुणी आहेत, आपणांवरही हल्ले होऊ शकतात, आपली जहाजे व वखारी लुटल्या जाऊ शकतात, याची जाणीव या निमित्ताने मराठी आरमाराने आपल्या शत्रूंना करून दिली. पुढे नानासाहेब पेशव्यांच्या काळात मराठ्यांचे आरमार नष्ट करण्यात आले. हे नष्ट करण्यात स्वत: पेशव्यांचाच हातभार फार मोठा होता! हे मराठी आरमार नष्ट होऊन समुद्रावर बिनधोक व एकमुखी प्रभुत्व स्थापन केल्याशिवाय युरोपीय सत्तांना भारतीय राजकारणावर ताबा मिळवता आला नसता. शिवाजीने दूरदृष्टीने स्वत:चे आरमार उभारले होते. मराठ्यांनी जर या आरमाराचा काळजीपूर्वक वापर केला असता, तर भारतावर ताबा मिळविणे इंग्रजांना शक्य झाले नसते. शिवाजीने सुरू केलेले मराठी आरमार ही सतराव्या-अठराव्या शतकातील भारतासाठी युरोपच्या आक्रमणापासून स्वत:च्या संरक्षणाची हमी होती- पण विधिलिखित यापेक्षा निराळे होते.

# ६. जनप्रिय राज्य

शिवाजी महाराजांनी निर्माण केलेल्या या राज्याचा जनतेच्या बाजूने काही विचार करायला पाहिजे. सर्वसामान्य जनतेला या राज्याविषयी एवढी प्रचंड आपुलकी का वाटावी, याचे उत्तर त्या राज्याची रचना कशी होत होती यावर अवलंबून आहे. हा भारतातील सरंजामशाहीचा काळ आहे. त्यामुळे सर्वत्र राजेशाह्या चालू आहेत. ही राजेमंडळी आपल्या राज्याची विभागणी सुभ्यांत करत. प्रत्येक सुभ्याकडून अमुक एक इतके उत्पन्न यावे अशी अपेक्षा असे. या सुभेदाराने स्वत:जवळ फौजा ठेवाव्यात, या फौजांचा व स्वत:चा खर्च चालवावा, खेरीज केंद्र सरकारला काही ठरलेली रक्कम द्यावी. ही ठरावीक वसुली झाल्यानंतर सुभ्यात जर शांतता असेल, तर उरलेल्या प्रश्नांकडे पाहण्याची राजसत्तेची प्रथा नव्हती. हे सुभेदार वतनदारांकडून ठरावीक मोबदला घेत असत. हे वतनदार देशमुख, देसाई आणि जहागीरदार असत. त्यांना मनसबदार, मिरासदार, इनामदार अशीही नावे असत. प्रत्येकाच्या अधिकारात थोडा थोडा फरक असला, तरी सरंजामशाहीचा हा शेवटचा दुवा होता. या वतनदारांजवळ थोडी फौजही असे. हत्यारांची संचणी बऱ्यापैकी असे. त्यांच्या गढ्या, वाडे-हुडे किल्लेवजा असत. जनतेच्या जीवनावर संपूर्ण अंमल करणारे हे वतनदार असत. सुभेदाराला ठरावीक महसूल पाठवून दिला आणि आपल्या देशात शांतता ठेवली, म्हणजे हे वतनदार एकेका छोट्या भागाचे निरंकुश सत्ताधीश होते. या वतनदारांना गुन्हेगारांना पकडणे, गुन्ह्याची चौकशी करणे आणि शिक्षा ठोठावणे यांचेही अधिकार असत. जनतेच्या गुलामगिरीतील हा सर्वात त्रासदायक दुवा होता. हा जनेतला तर त्रासदायक होताच, पण राजसत्तेलाही त्रासदायक होता. एखादा जबरदस्त वतनदार प्रबळ होऊन बसला म्हणजे त्याचा लष्करी पाडाव करण्याशिवाय दुसरा मार्ग नसे आणि नेहमीच या वतनदाराचा पाडाव करणे सोपे नसे. कारण वतनदार आपापसांत सोयरसंबंधांनी बांधलेले असत. आणि त्यांच्याजवळ असणाऱ्या फौजा हाच राज्यांचा फौजांचा मुख्य आधार असे. हा वतनदार शिवाजीच्या नुसत्या धर्माचा नव्हता, तर पुष्कळदा त्याच्या नात्यागोत्याचा व सोयरसंबंधाचा होता. हा वर्ग प्राय:

शिवाजीचा शत्रू राहिला! या वर्गाने शिवाजीला शक्य तो त्रास दिला. आरंभापासून यांच्याविरुद्ध शिवाजी लढत राहिला. वतनदार म्हणजे राज्याचे दायाद होत, असे सूत्र अमात्यांच्या 'राजनीती'त यामुळेच आलेले आहे.

### वतनदारांचा अपरिमित स्वार्थ

या वतनदारांचा राजसत्तेला दुहेरी त्रास असे. वतने वंशपरंपरा असत. त्यामुळे वतनदारीचा मोह सर्वांनाच प्रचंड होता. माणसे या वतनदारीच्या रक्षणार्थ लीलया कत्तली करण्यास तयार होत. या मुद्यावर कुठे आपपर भाव नव्हता. वतनदारांची पिढीजात वैरे असत. त्यामुळे दर पिढीला एक भांडण होतच असे. राज्य बदलले, नवा शत्रू आला, तर वतनदार लढण्यापेक्षा त्याच्याकडून वतनाची हमी घेऊन त्याच्या बाजूने सामील होत असत! गरजेनुसार युद्धावर येण्यास टाळाटाळ करीत; ठरलेला महसूल राजसत्तेला देत नसत. या वतनदारांची निष्ठा फक्त वतनावर असे. त्यांना देश स्वतंत्र राहिला काय आणि गुलाम झाला काय, या दोहोंतही फारसा रस नव्हता. पण या वतनदारांचा खरा त्रास गोरगरीब जनतेला होता. वतनदाराने करवसुली म्हणून काय घ्यावे, याला सीमाच नव्हती. हिंदूंचा धार्मिक कायदा - खर्चवेच वजा जाता शिल्लक राहिलेल्या उत्पन्नाचा षष्ठांश राजाला कर म्हणून द्यावा असे सांगतो, पण तो पोथीतला कायदा होता. आपल्याला कर किती वसूल करायचा हे वतनदार ठरवत. त्याचा फारच थोडा भाग वर जात असे. उरलेला वतनदार खाऊन टाकीत. सभासद सांगतो, हजार दोन हजार हे मिरासदार घेत, त्यातून दोन-तीनशे दिवाणात जमा करत. त्यामुळे प्रजा सर्व दृष्टींनी नागवली जात असे. पीक चांगले येवो अगर वाईट येवो, जनतेचे दैन्य आणि दारिद्र्य चिरस्थायी होते. या मुद्द्यावर तक्रार करण्याची कुठे सोय नव्हती.

### शिवाजीचे शासन

भरले खळे जमीनदाराने लुटले, तर तक्रार कुणाजवळ करायची? तक्रारी स्वीकारणारा, न्यायनिवाडा करणारा पुन्हा वतनदारच होता! त्याच्या अनियंत्रित कारभारात कोणत्याही प्रकारचा अत्याचार क्षम्यच होता. जनतेचे वित्त सुरक्षित नव्हते. त्याहून भयानक म्हणजे अब्रू सुरक्षित नव्हती. देखण्या मुली वतनदार राजरोस पळवत. गरत्या स्त्रियांच्या अब्रूवर धाड घालत. याविषयी तक्रार करण्यास जागा नव्हती. शिवाजीच्या राज्याच्या आरंभी रांझे येथील पाटलांचे हात-पाय अशाच एका बदअमल प्रकरणी तोडावे लागले होते. सर्वसामान्य

जनतेवर अत्याचार करणाऱ्या शोषक वरिष्ठ वर्गाला आणि गुंडांना जातिधर्माची मर्यादा नसते, इतकाच याचा अर्थ आहे.

### वतनदारीचा विनाश महत्त्वाचा

या वतनदारांच्या त्रासाबरोबर एक फौजेचा त्रास असे. मध्ययुगात प्रचंड फौजा एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जात असत. या घटनेचा जनतेच्या बाजूने कुणी फारसा विचार करत नसे. या फौजा आपले घोडे, बैल चारण्यासाठी सरळ उभ्या पिकांत जनावरे घालत. गरज पडेल तिथून कडबा लुटून घेत; धान्य आणीत. सगळेच धान्य विकत घेतले जात नसे. फौजांचा स्त्रियांना त्रास होतच असे. फौजांचे संचलन ज्या भागातून झाले, तो प्रदेश पाहता पाहता उजाड होऊन जाई. आपल्याच राजाच्या फौजा आपलाच प्रदेश तुडवीत अशा रीतीने फिरत. या फौजांच्या संचलनाला कुणीच अटकाव करू शकत नसे. वतनदारांचे तर या फौजांची सर्व प्रकारे व्यवस्था करणे कामच असे. शिवाजीच्या राज्याचे रहस्य समजून घ्यायचे असेल तर त्यासाठी नुसता अफझलखानाचा वध समजून घेऊन उपयोग नाही. शिवाजीने जिद्दीने घडवून आणलेला हा वतनदारीचा वध सर्वांत महत्त्वाचा आहे.

### हा लढा अद्याप संपलेला नाही

दादोजी कोंडदेवांच्या नेतृत्वाखाली आरंभापासून शिवाजी या नादाला लागलेला आहे. त्याने बारा-मावळ ताब्यात घेऊन जी पहिली व्यवस्था केली तिचे स्वरूप हे आहे. सभासद सांगतो, 'येताच बारा मावळे काबीज केली. मावळे, देशमुख बांधून, दस्त करून, पुंड होते त्यास मारले. बहुत सावधपणे चौकशीने वर्तणूक करीत राहिले.' सभासदाचे हे वाक्य चटकन समजण्याजोगे नाही. शिवाजीच्या पुढच्या कारकीर्दीचे वर्णन करताना सभासद पुन्हा एकदा सांगतो की, 'मोकासे कोणास देणे नाही. मोकाशामुळे जमीनदार बेकैद होतात. मुलखात जमीनदार, देशमुख व देसाई यांच्या जप्तीखाली कैदेत रयत नाही. त्यांनी साहेबीन करून नागवीन म्हटलीयाने त्यांच्या हाती नाही.' 'शिवाजीने वतनदारांचे वाडे-हुडे, कोट पाडून टाकले.' असल्या प्रकारचे जे फुटकळ उल्लेख सभासद करतो त्यामधून व शिवाजीच्या कागदपत्रांमधून हा वतनदारी-विरुद्धचा लढा स्पष्ट होतो. मध्ययुगीन भारतात शिवाजीने दिलेला वतनदारीविरोधी लढा हा एकुलता एक आहे. आधुनिक भारतात अजूनही हा लढा संपलेला नाही.

### यशाचे गमक

शिवाजीने पुन्हा एकदा सर्व जमिनींची मोजमापे केली. ही मोजमापे करण्यासाठी काठीचे माप वापरले. बिघे, चावर अशी जमीन मोजून प्रत्येक गावाची जमीन निश्चित केली. ही जमीन कोण वहित करणार याची निश्चिती करून टाकली. या जमिनीत पीक किती येते याची काळजीपूर्वक तपासणी केली. जे एकूण पीक येईल त्याचे तीन वाटे प्रजेला व दोन वाटे राजाला, अशी विभागणी करून टाकली. धर्मशास्त्रात खर्च-वेच जाता उरलेल्या उत्पन्नाचा षष्ठांश सांगितलेला आहे. शिवाजीच्या राज्यात खर्च-वेच वजा न धरता एकूण उत्पन्नाचा दोनपंचमांश म्हणजे सुमारे चाळीस टक्के कर आहे. हा कर लहान नाही, पण ही वाटणी सर्वांनी अत्यंत आनंदाने व उत्साहाने स्वीकारली, त्यासाठी लोक पिढ्यान्‌पिढ्या शिवाजीचे ऋणी राहिले, हे लक्षात घेतले तर शिवाजीच्या पूर्वी जनतेला काहीच मिळत नव्हते, ही गोष्ट समजून येईल! एकदा जमीन निश्चित ठरली, तिचे कर निश्चित ठरले, त्यातून समाधानाने जगण्यापुरते उत्पन्न सुटू लागले. सर्वांच्यावर कर सारखे बसले, त्यांची वसुली पक्षपात न होता चालू लागली व एकदा एवढे कर दिल्यानंतर संपूर्ण संरक्षण आणि न्याय यांचे आश्वासन मिळाले म्हणजे मग तक्रार कोणतीही उरत नाही. शिवाजीने प्रजेला समाधान मिळू शकेल अशी करयोजना पुरस्कारली आणि तिची पक्षपातरहित निर्दोष अंमलबजावणी वर्षानुवर्षे करून दाखवली, हे त्याच्या राजवटीच्या यशाचे एक गमक आहे.

### चोख शासन

कायद्यात कर किती लिहिलेले असतात याला महत्त्व नसते, प्रत्यक्षात किती द्यावे लागतात याला महत्त्व असते. हे दिल्यानंतर सुखासमाधानाने जगण्याइतके शेतकऱ्यांच्या घरी शिल्लक राहते काय, याला महत्त्व असते. शिवाजीने या मुद्द्यावर आपल्या राज्यातील प्रत्येक नांगर चालवणाऱ्या पुरुषाचा आणि त्याला न्याहारी देणाऱ्या स्त्रीचा दुवा मिळवला आणि त्याच्यासाठी मरणाला लोक तयार झाले. हाही शिवाजीने लावलेली व्यवस्था अतीव सुखाची ठरल्याचा पुरावा आहे. याला जोड म्हणून मधूनमधून येणाऱ्या दुष्काळात त्याने करमाफी दिली. दुष्काळानंतर शेतकऱ्यांना बैल, बी-बियाणे मिळेल, नवे पीक येईपावेतो अन्न मिळेल याची सोय केली. नवी गावे वसवण्यास आलेल्या मंडळींना बैल, नांगर दिले, बी-बियाणे व जगण्यासाठी पैसा दिला. तो त्यांच्याच उत्पन्नातून काढून घेतला. या साऱ्या योजना भाषेत सारेच पुरस्कारितात. त्यांची पक्षपातरहित चोख

अंमलबजावणी महत्त्वाची असते. शिवाजीने ते करून दाखवले. शिवाजीचा या कार्यातील सर्वांत मोठा व विश्वासू सहकारी अण्णाजी दत्तो होता हे लक्षात घेतले पाहिजे.

## आद्य निष्ठा ध्येयवादाला

शिवाजीने आपला घोडा व शस्त्र देऊन बारगिरांची शाही फौज उभी केली. शिलेदारांचे प्रस्थ मोडले. वतनदारांच्या फौजा काढून घेतल्या. त्यांचे बळकट वाडे तोडले. अधिक महत्त्वाची ठिकाणे आपल्या ताब्यात घेतली. त्यांची उत्पन्ने ठरवून दिली. करवसुलीचे व न्यायनिवाड्याचे त्यांचे हक्क काढून घेतले. याविरुद्ध गडबड करणाऱ्यांचे हात-पाय तोडले. मध्ययुगात स्त्री ही स्वाभिमानाची, कुटुंबाच्या अब्रूची खूण असते. आपल्या राज्यात स्त्रीची अब्रू बिनधोक करून शिवाजीने प्रजेला पोटभर अन्न दिले. स्वाभिमानाला संरक्षण दिले. ही स्त्रीची अब्रू सांभाळण्यासाठी त्याने निष्ठावान विजयी सेनापती सखोजी गायकवाड याचेही डोळे काढण्यास कमी केले नाही! कारण निष्ठा 'शिवाजी' या व्यक्तीला पुरत नाही, आद्यनिष्ठा त्याच्या ध्येयवादाला असली पाहिजे. शिवाजीने वतनदारांचा पैसा, राज्यकारभाराचा पैसा, फौजांचा खर्च- या सर्व बाबींची सोय आपल्याला मिळणाऱ्या दोनपंचमांशात लावली. एकदा ठरलेला कर दिला म्हणजे पुन्हा द्यावयाचे काही नाही, ही ती शिस्त आहे. या शिस्तीत अडथळा नेहमीच नातेवाईकांचा, वशिलेबाजांचा, पक्षपाती कारभाराचा होत असतो, म्हणून शिवाजीने परंपरागत अधिकार काढून घेतले. एक सेनापती गेल्यावर नवा सेनापती आला. त्याचा मुलगा सेनापती झाल्याने थोडी लाचलुचपतीची शंका येताच, त्याने तातडीने पंतप्रधान बडतर्फ केले. शांतता रक्षणाची जबाबदारी किल्ल्यावर टाकली. किल्ले केंद्रीय सत्तेच्या हाती घेतले. एक प्रकारे केंद्रीय राजसत्तेच्या वतीने शिवाजीने सर्व गुलामगिरी आणि मानभंगाच्या समाप्तीची घोषणा करण्याचा हा प्रकार आहे. यामुळे त्याला स्वातंत्र्याचा नेता म्हणतात.

## मुलकी सत्तेचे श्रेष्ठत्व स्थापन केले

मध्ययुगात शिवाजीने सामान्यांचे सेनापती केले. कर्तृत्वानुसार प्रगतीचे रस्ते मोकळे केले. उंबरठ्याचा कुणबी हरामांचा सुभेदार होण्याची शक्यता असते. त्याने त्या काळात तलवारीच्या जोरावर राज्य निर्माण केले. तलवारीच्या जोरावर राज्यरक्षण केले, पण 'साहेबी कारकुनाची' अशी घोषणा केली. गड-कोटांना

काय हवे ते कारकून देतील. जनतेकडून कर घ्यायचे ते कारकून घेतील. फौजांना जाताना गावाला काही मागण्याचा हक्क नाही. फुकट घेऊ नये. आपल्या प्रजेची लूटमार हा त्याने दंडनीय गुन्हा ठरवला. त्याच्या फौजांकडून एका जत्रेतील लोकांस उपसर्ग झाल्याचे कळताच, त्याने जातीने चौकशी करून तीनशे लोकांचे हात तोडले, कारण बळकटपणे तलवारी हातात घेणारे बलशाली हात यांच्यापेक्षा या प्रत्येक शासनामागे उभा असणारा जनतेचा बलशाली आशीर्वाद हा त्याला महत्त्वाचा वाटत होता! जनतेच्या राज्यात लष्कराने लढावे, पराक्रम करावेत. जनतेने त्यांचे आधिपत्य स्वीकारावे, पण कारभार ठीक करायचा असेल, तर मुलकी सत्ता ही लष्करी सत्तेहून श्रेष्ठ असली पाहिजे. 'साहेबी कारकुनाची'- याचा अर्थ हा आहे. मध्ययुगात मुलकी सत्तेचे श्रेष्ठत्व सांगणारा हा माणूस भारताच्या इतिहासात तर एकटाच आहे. जगाच्या इतिहासातही तो निराळा आहे, वेगळा आहे. नेपोलियनने सिव्हिल कोड दिले म्हणून त्याचे मोठेपण सांगणाऱ्यांनी शिवाजीने सिव्हिल ॲथॉरिटीचा पुरस्कार केला याचा कधी विचार केलेला दिसत नाही, शिवाजीची ही राज्यनिष्ठा पाहिल्यानंतर रामदास त्याला, 'शिवकल्याण राजा' का म्हणतो हे समजू शकेल.

### निर्दोष नैतिक बैठक

शिवाजी हा प्रजेचा कल्याणकर्ता होता, जनतेच्या स्वातंत्र्याचा पुरस्कर्ता होता. याचे मूळ कारण असे आहे की, त्याची नैतिक बैठक निर्दोष होती. रावणाने सीता पळवली, या मुद्द्यावर तक्रार करण्याचा हक्क ज्यांनी कधी शत्रूच्या अगर मित्रांच्या स्त्रिया पळवल्या नाहीत त्यांना असतो. स्वत:च्या स्त्रियांच्या बेअब्रूविषयी चिडणाऱ्यांना सर्वांच्या स्त्रियांच्या अब्रूची काळजी घ्यावी लागते. एरवी, 'आमच्या स्त्रिया भ्रष्ट झाल्या,' या आक्रोशाला अर्थ नसतो. धार्मिक आक्रमणाला उत्तर - सर्वधर्म - समभाव, हे असते.

### आदर्श राज्यसाधना

शिवाजीच्या शत्रूंनी त्याच्याविषयी चीड, संताप व्यक्त करताना दोन गोष्टी सदैव सांगितल्या आहेत. एक म्हणजे त्याने स्वत: अगर आपल्या सैन्याकडून स्त्रियांची विटंबना कधी होऊ दिली नाही. जनावरांचे आठवडी बाजार चालतात, तसे स्त्रियांच्या विक्रीचे आठवडी बाजार चालणाऱ्या त्या युगात शिवाजीने शत्रूच्याही स्त्रीला अटक करू दिली नाही. कधीही विरोधकांच्या धर्मग्रंथांचा आणि पूजास्थानांचा अवमान त्याने केला नाही. युद्धाच्या वावटळीत धुळीत

पडलेली कुराणाची प्रतही त्याने सदैव आदराने जतन केली व नव्या मुक्कामावर मुसलमान धर्माचा माणूस पाहून त्याच्या हवाली केली. कारण 'सूड' ही शिवाजीची प्रेरणा नव्हे. वैयक्तिक जीवनातील भोगलालसा त्याला नव्हतीच. तो संयमी, आदर्श गृहस्थजीवन जगला. त्याच्या प्रेरणा आध्यात्मिक होत्या. एखादी आध्यात्मिक धर्मसाधना चालावी तशी त्याची राज्यसाधना चालू होती. तो जनतेच्या स्वातंत्र्याचा नेता होता. निर्दोष आणि सुखी कारभाराचा सावध प्रणेता होता, तसा तो या राज्याचा उपभोगशून्य स्वामी होता. म्हणून रामदास त्याला 'श्रीमंत योगी' म्हणतात. साधु-संतांनी त्याला स्वत:च्या शेजारी आपला म्हणून स्वीकारले. जनता त्याला ईश्वरी अवतार मानीत असली, तर ही श्रद्धाळू मनाने आपल्या चारित्र्यवान स्वातंत्र्य-योद्ध्याला दिलेली स्वाभाविक मानवंदना असते. तिची चिकित्सा खरोखरच देव आहे काय, या शुष्क पातळीवर करणे म्हणजे आपल्या अज्ञानाचे प्रदर्शन करणे होय!





शिवाजी महाराजांनी केलेली राष्ट्रीय जागृती,
इतर धर्मीयांसंबंधीचे त्यांचे धोरण आणि
त्यांची प्रजेसंबंधीची कर्तव्यभावना यातूनच
भूमिपुत्रांचा स्वाभिमान जागृत झाला.
ते धर्मनिष्ठ होते. हिंदू धर्मावर त्यांची श्रद्धा होती.
इतर धर्मीयांना ते भेदभावाने वागवीत नसत.
त्यांनी सामान्य मावळा शेतकरी आपल्या राज्याचा
आधार मानला. आपल्या नैतिक आचरणाने सामाजिक
व्यवहारात आदर्श निर्माण केला. सत्प्रवृत्तीने
प्रजेचे हित पाहण्याचे धोरण त्यांनी स्वीकारले.
या सर्व गुणांतच त्यांच्या यशाचे
आणि लोकप्रियतेचे रहस्य सामावलेले आहे.

